# वेचलेले मोती

---

लेखक

प्रो. ना. सी. फडके



रामकृष्ण बुक डेपो
गिरगांव : मुंबई ४

---

ऑगस्ट १९४१

---

किंमत २ रुपये

# वेचलेले मोती




लेखक

प्रो. ना. सी. फडके, एम्. ए.



रामकृष्ण बुक डेपो,

गिरगांव, मुंबई ४

१९४१

# अनुक्रमणिका

# १ : : अग्नि आणि काष्ठ

जर्मनींत नात्सी राजवटी सुरू झाल्यापासून जुलूमजबरदस्तीला जितकी भरती आली तितकीच त्या राजवटीच्या उग्र स्वरूपाचीं वर्णनं करणाऱ्या पुस्तकांनाहि आली. एकामागून एक छोटे छोटे देश आपल्या सत्तेखालीं ओढण्याची आधुनिक स्वरूपाची 'राघोभरारी' हिटलरनं सुरू केल्यापासून अशा कादंबऱ्या भराभर बाहेर पडूं लागल्या. माझ्या वाचनांत असल्या पंचवीस तरी कादंबऱ्या आल्या असतील. किंबहुना असल्याच कादंबऱ्यांना गेल्या दीड वर्षांत इंग्रजी पुस्तकांच्या बाजारांत सर्वांत जास्त मागणी आहे. मात्र यांपैकीं बहुतेक कादंबऱ्या कलेच्या दृष्टीनं फार सामान्य दर्जाच्या ठरतील. मधूनच एखादीच कादंबरी अशी आढळते कीं, नात्सी सत्तेच्या भीषण कृत्यांचं वर्णन म्हणूनच नव्हे, तर ललित वाङ्मयाच्या दृष्टीनंहि ती श्रेष्ठ मानावी लागेल. अशा एका कादंबरीचा गुणग्राहक परिचय मी वाचकांना करून देणार आहे.

या कादंबरीचं नांव " The Fire and the Wood " असं आहे. ( प्रकाशक 'कॅसेल', किं. ९ शि. ) हिच्या कर्त्याचं नांव

" R. C. Hutchinson " असं आहे. या कादंबरीच्या पहिल्या पानावर कादंबरीच्या नांवाखालीं 'A Love Story' असं उपशीर्षक लेखकानं स्पष्ट घातलं आहे. प्रचारात्मक कादंबरी देखील अंतीं एक हृद्य प्रेमकथाच असते, असं ध्वनित करण्याची त्याची इच्छा असावी. मराठींतल्या राजकीय कादंबऱ्यांवर टीका करतांना आमच्यांतले कांहीं लेखक 'या कादंबरींत एक प्रेमकथाच अनुस्यूत असल्याचें दिसतें' असं गर्भित उपहासानं म्हणतात. त्यांची कल्पना अशी दिसते कीं, राजकारणाच्या पार्श्वभूमीवर लिहिलेल्या कादंबरींत प्रेमकथेला प्राधान्य देणं उचित नव्हे. दुर्दैवानं त्यांची ही टीका नामवंत लेखकांना मान्य दिसत नाहीं. " मनोहरची आकाशवाणी" या माझ्या पुस्तकांत राजकीय पार्श्वभूमीवर उभारलेल्या तीन उत्कृष्ट कादंबऱ्यांचा मीं अंतर्भाव केला आहे. 'ब्रूनो फँक' यांची 'क्लोझ्ड फ्रॉंटियर्स', 'फिकी बाउम'ची 'सीक्रेट सेंटेन्स' व 'अॅप्टन सिंक्लेअर' यांची 'नो पासारां ! '. यांपैकीं प्रचारात्मक कादंबरी लिहिणारे म्हणून अॅप्टन सिंक्लेअर यांची ख्याति आहे व 'नो पासारां' ही कादंबरी त्यांच्या सर्व कृतींत श्रेष्ठ ठरली आहे. पण तीसुद्धां एक प्रेमकथाच आहे ! राजकारणात्मक अगर प्रचारात्मक कादंबरीचं मर्मस्थान प्रेमकथेंत असलं तर तें तिचं एक वैगुण्य ठरेल हा आमच्या टीकाकारांचा कोटिक्रम या श्रेष्ठ कलावंतांना मान्य नाहीं असं दिसतं ! आणि आतां तर माझ्या हातीं हचिन्सनची ' अग्नि आणि काष्ठ ' नांवाची जी कादंबरी आहे तिचा हेतु प्रचारात्मक आहे व पार्श्वभूमि राजकारणाची आहे याबद्दल संशयाला जशी जागा नाहीं, त्याप्रमाणेंच ती एक प्रेमकथा आहे याबद्दल संशयाला जागा राहूं नये म्हणून लेखकानं स्वतःच तिच्या नांवाखालीं ' A Love Story ' असं स्पष्ट लिहून ठेवलं आहे !

ही कादंबरी सर्व दृष्टींनीं सरस ठरण्यासारखी नाहीं. विशेषतः

तिचा ४१८ पानांचा विस्तार एक मोठा दोष ठरेल. त्याचप्रमाणें व्यक्तिव्यक्तींच्या मनांतील त्या त्या वेळचे विचार जशा अव्यवस्थित स्वरूपांत उद्‌भवले तसेच नमूद करण्याची जी पद्धति लेखकानं स्वीकारली आहे तिच्यामुळें निवेदनांतील वास्तवतेचा उत्कर्ष होत असला, तरी वाचकाच्या वृत्तीवर ताण पडून ती नकोशी वाटण्याचा संभव आहे. परंतु हे दोष ज्यांमुळें दृष्टीआड करावेसं सहज वाटावं असे कांहीं गुण या कादंबरींत खचित आहेत. त्याचंच विवेचन आपल्याला करायचं अहे.

कादंबरीच्या कथानकांत वाकडी तिकडी किचकट गुंतागुंत बिलकुल नाहीं. कथानकाचा सांगाडा सुबोध व सरळ आहे. 'जोसेफ झेपिक्मन' नांवाचा एक चोवीस वर्षांचा ज्यू तरुण होता. त्यानं मेडिकल कॉलेजांत अभ्यास करून डॉक्टरची पदवी मिळविल्याबरोबर 'हार्टझिन्फिल्ड' येथील सरकारी इस्पितळांत त्याची नेमणूक झाली. नोकरीवर रुजू होण्यापूर्वीपासूनच जोसेफ्नं क्षयरोगनिवारक औषधाचं संशोधन चालविलं होतं, व त्याची गुप्त महत्त्वाकांक्षा अशी कीं, आपला हा शोध अखेर यशस्वी होईल व आपण एक असमान्य संशोधक ठरूं. आपल्या औषधाचे प्रयोग त्यानं उंदरांवर केले होते व ते त्याला समाधानकारक वाटले होते. परंतु माणसावर प्रयोग केल्याखेरीज सिद्धांत कसा बसविणार ? म्हणून तो जेव्हां आपल्या नोकरीवर रुजू झाला तेव्हां इस्पितळांतल्या क्षयरोग्यांवर प्रयोग करण्याची परवानगी इस्पितळाचा मुख्य डॉक्टर विल्डेलाऊ याच्याजवळ त्यानं मागितली. परंतु तें इस्पितळ नात्सी शिस्तीप्रमाणें चालणारं होतं व स्वतंत्र विचाराला त्या ठिकाणीं वाव नव्हता. अर्थात् विल्डेलाऊनं परवानगी देण्याऐवजीं जोसेफ्ची थट्टा मात्र केली. जोसेफ्ला वाईट वाटलं. परंतु दैवानं त्याला अकस्मात् मदत केली. तो भाड्यानं खोली घेऊन ज्या खाणावळींत

राहूं लागला तिथें झाडलोट करणाऱ्या मुलीला दीर्घकालचा क्षय असल्याचं त्याला आढळून आलं. तिचं नांव 'मिना वेरसेन.' एके दिवशीं जेव्हां वरच्या माळ्यावर आपल्या खोलींत ती तापानं फणफणून व खोकल्यानं जर्जर होऊन पडली तेव्हां त्यानं खाणावळीच्या मालकिणीची परवानगी काढून तिची केस आपल्या हातीं घेतली, व आपल्या नव्या औषधाचे प्रयोग तिच्यावर करून पाहण्याचं त्यानं ठरविलं.

याच्या आधीं एक लहानशी घटना घडली तिचा उल्लेख केला पाहिजे. कारण या लहानशा प्रसंगांत पुढच्या एका मोठ्या पेचप्रसंगाचं बीज आहे. खोली पाहायसाठीं जेव्हां तो खाणावळींत गेला, तेव्हां जी खोली रिकामी होती तिच्यापेक्षां दुसरीच एक खोली त्याला अधिक पसंत पडली. ती मोठी होती व छोटीशी प्रयोगशाळा तिथें सहज थाटतां आली असती. परंतु त्या खोलींत हेर मायसेल् नांवाचा एक जर्मन तरुण कित्येक दिवसांपासून आधींच राहत होता. तरी खाणावळीणबाईला अधिक भाड्याची लालूच दाखवून ती खोली जोसेफ्नं मिळविली; इतकंच नव्हे, तर मायसेल्च्या सम्मतीची वाट न पाहतां त्यानं त्याचं सारं सामानसुद्धां काढून तें पलीकडच्या छोट्या खोलींत टाकलं, व स्वतःची आपल्याला हव्या त्या खोलींत प्रतिष्ठापना करून टाकली. मायसेल् परत आला तेव्हां त्याचं जोसेफ्शीं चांगलंच भांडण झालं, परंतु खाणावळीणबाई आतां त्याच्या बाजूची असल्यामुळें जोसेफ्ला मायसेल्ची खोली कायमची मिळाली. मात्र खोलीबरोबर मायसेल्चं वैरहि त्यानं संपादन केलं.

हॉस्पिटल्मधील नोकरीचं आपलं काम जोसेफ् अगदीं चोख बजावीत होता. परंतु त्याचं सारं खरं लक्ष माळ्यावर अंथरुणांत पडलेल्या ज्वरपीडित मिनाकडेच सदैव असे. त्यानं त्या केसचा

अभ्यास अगदीं शास्त्रोक्त पद्धतीनं सुरू केला. तिच्या आजाराची दैनंदिनी ठेवून औषधाच्या प्रतिक्रियेचीं टिपणं करणं, प्रत्येक लक्षणाचा नकाशा तयार करणं, इत्यादि सर्व गोष्टी त्यानं अगदीं शिस्तीनं चालविल्या. परंतु अर्थात् या करतांना त्या मुलीची परोपरीची शुश्रूषाहि त्याला करावी लागली. तिची खोली रोज स्वतः झाडण्यापासून तों तिची वेणीफणी करण्यापर्यंत सारे उद्योग त्यानं आस्थेनं केले. आणि यांतूनच त्यानं कधींहि न अपेक्षिलेली अशी घटना निर्माण झाली!

त्याचं मिनावर प्रेम बसलं!

आणि अंतःकरणांत प्रेमाची मृदु भावना उद्भवतांच संशोधकाची कठोर भूमिका चालू ठेवणं त्याला अशक्य झालं!

प्रीति आणि संशोधनलालसा एकत्र काम करीनात! पूर्वी तिला तो आपल्या औषधाचं इंजेक्शन देई त्या वेळीं तिच्या दंडांत सुई टोचतांना तो निर्विकार असे. परंतु आतां त्याला तो मृदु, कृश हात प्रिय होता व तो दुखविण्याचं धैर्य त्याला होईना!

एके दिवशीं इंजेक्शन्‌ची सारी तयारी केल्यावरहि त्यानं मिनाला सांगितलं, "छेः! माझ्यानं हे व्हायचं नाहीं. मी आपले प्रयोग तुझ्यावर करूं इच्छीत नाहीं."

तथापि मिनाहि जोसेफ्‌वर अनुरक्त झाली होती, व आपल्या प्राणापेक्षां त्याच्या यशाची किंमत तिला जास्त वाटूं लागली होती. या प्रसंगीं त्या दोघांचा जो संवाद झाला, त्याच्या सौंदर्याविषयीं मी पुढें विस्तारानं सांगणारच आहे. कथानकाच्या ओघासाठीं या ठिकाणीं इतकंच सांगतों कीं, आपले प्रयोग चालू ठेवण्यासाठीं मिनानं जोसेफचं मन वळविलं.

मध्यंतरीं जोसेफ्‌च्या ध्यानींमनींहि नव्हत्या अशा कांहीं घटना घडत होत्या. मायसेल्‌नं त्याच्यावर डाव धरला होता व तो

त्याच्याविषयीं खरे खोटे गुप्त वृत्तान्त बर्लिनला पाठवीत होता. जोसेफ्च्या छळाची कारस्थानं शिजूं लागलीं होतीं. त्यांचा पहिलाच स्फोट असा झाला कीं, त्याला नोकरीवरून दूर करण्यांत आलं. परंतु या संकटाची जोसेफ्ला फारशी मातबरी वाटली नाहीं. मिनाचे प्राण वांचविणं व आपलं संशोधन सिद्ध करणं अशा दुहेरी महत्त्वाकांक्षेनं तो प्रेरित झाला होता व जोंपर्यंत त्याचा हा मार्ग कुणी बंद केला नव्हता तोंपर्यंत त्याला कशाची पर्वा होती ? त्यानं आपले कपडे विकले, सायकल विकली, सिग-रेट्स कमी केल्या व एक वेळचं जेवण बंद केलं. त्याचं सारं चित्त मिनाकडे लागलं होतं. आतां एकच अखेरचं इंजेक्शन तिला दिलं, कीं तिच्या शरीरावर त्याची प्रतिक्रिया काय होते तें पाह्यला सापडल्याबरोबर त्याचं नशीब ठरणार होतं. हें इंजेक्शन मोठं धोक्याचं होतं. त्याचा इष्ट परिणाम झाला तर त्याची लाडकी मिना खाचित वांचणार होती, व त्याचा संशोधनाचा मार्ग बरोबर ठरणार होता. परंतु उलट असाहि संभव होता कीं, त्या इंजेक्शन-ची भलतीच प्रतिक्रिया व्हावी. तसं घडलं तर मात्र यश व मिना दोहोंनाहि तो कायमचा मुकणार होता. तथापि सारं धैर्य एकवटून त्यानं मिनाला तें इंजेक्शन दिलं. तो तिच्याजवळ रात्रभर बसला. दुसऱ्या दिवशीं मध्यरात्रीं मिनाची जी अवस्था दिसेल तिच्यावर त्याचं सारं भवितव्य अवलंबून होतं. मध्यरात्रीच्या आधीं थोडी विश्रांति घेतल्यावांचून त्याला राहवेना म्हणून तो आपल्या खोलींत अंथरुणावर जरा आडवा झाला.

आणि त्याच घटकेला त्याच्यावर दुर्दैवानं झडप घातली ! त्याला गिरफदार करून पकडण्यांत आलं ! मिनाची अखेरची भेट त्याला पांच मिनिटंच घेतां आली. आणि त्या वेळीं तर मिना धड शुद्धीवरहि नव्हती ! पकडण्यास आलेल्या सैनिकांना चुकवून तो

फक्त दोनच गोष्टी करूं शकला. आपलीं संशोधनाचीं टिपणं व मिनाच्या फुफ्फुसाचे फोटो त्यानं आपल्या खोलींत ठेवण्याऐवजीं मिनाच्या खोलींत ठेवले होते, ते तिथं सुखरूप आहेत एवढं त्यानं पाहिलं; व तिच्या उशागतीं त्यानं घाईघाईनं एक चिठी लिहून ठेवली : " फार महत्त्वाचें... डॉ. आइल्वार्थ यांच्या स्वाधीन ही केस करावी." मिना तर शुद्धींत नव्हतीच. जोसेफ् आपल्याला काय सांगतो तें तिला धड कळत नव्हतं. तो आपलं चुंबन घेत आहे एवढीच संवेदना तिला होत होती, व "जोसेफ्! माझ्या लाडक्या!" एवढेच शब्द ती क्षीण आवाजांत बोलूं शकत होती.

जोसेफ्‌ला चौकशीसाठीं अधिकाऱ्यांपुढें उभं करण्यांत आलं त्या वेळीं त्याचा जो अमानुष छळ करण्यांत आला, व पुढें तुरुंगांत त्याच्या वांट्याला जे भोग आले त्यांचीं वर्णनं अंगावर शहारे उभे करणारीं आहेत. परंतु या वर्णनांत जीं सहा प्रकरणं ग्रंथकर्त्यानं खर्चिलीं आहेत तीं कथानकाची ओढ कमी करणारीं आहेत.

पण यानंतर वाचकाला हचिन्सन यानीं विस्मयाचा अनपेक्षित धक्का दिलेला आहे. तो असा कीं, जोसेफ्‌ची तुरुंगांतून एकदम सुटका झाली असं त्यांनीं दाखविलं आहे आणि त्या सुटकेचं कारण काय, तर मिना सरकारी अधिकाऱ्यांकडे जोसेफ्‌च्या विरुद्ध खटला भरते! तिच्या वकिलाचा जोसेफ्‌वर असा आरोप असतो कीं, 'जोसेफ् नांवाच्या एका महामूर्ख डॉक्टरानं मिना वेरसेन या जर्मन मुलीला भलतीं औषधं देऊन तिचा प्राणघात करण्याचा प्रयत्न केला!' या आरोपाची चौकशी करायची झाल्यास जोसेफ्‌चीं सारीं टिपणं कोर्टांत दाखल करणं भाग होतं. तीं टिपणं जोसेफ्‌नं आपल्या खोलींत कुठं तरी लपवून ठेवलीं असलीं पाहिजेत अशी अधिकाऱ्यांची समजूत होती, व तीं हस्तगत करण्यासाठीं त्यांनीं शक्कल काढली ती अशी, कीं जोसेफ्‌ला सांगावं–जा, तुला सोडून

दिलेलं आहे. हें ऐकतांच तो साहजिकपणें आपल्या खोलींत परत जाईल, व लपवून ठेवलेलीं तीं टिपणं बाहेर काढील. तो ती गोष्ट करीत असतांनाच त्याला पकडलं म्हणजे झालं.

परंतु अधिकाऱ्यांची ही युक्ति यशस्वी होण्याऐवजीं मिनाच्या चातुर्यानं जोसेफ् मात्र कायमचा सुटला.

ज्या वकिलानं अधिकाऱ्यांवर खटला भरण्याची युक्ति मिनाला सुचविली होती, त्यानंच तिच्यासाठीं व जोसेफ्साठीं बनावट परवाने मिळवून दिले. तीं दोघं निराळ्या नांवांखालीं नवराबायको म्हणून जर्मनीची सरहद्द ओलांडून नेदरलंड्सच्या मार्गानं अखेर इंग्लंडला गेलीं. मध्यंतरीच्या हालअपेष्टांनीं जोसेफ्ची प्रकृति अजीबात ढासळली होती. त्याला क्षय जडला होता. परंतु इंग्लंड-मधील एका नामांकित इस्पितळांत त्याच्यावर त्यानं ज्या औषधाचं संशोधन केलं होतं त्याचेच प्रयोग करण्यांत आले. तो बरा झाला. त्याचं संशोधन यशस्वी म्हणून शास्त्रज्ञांनीं मान्य केलं, आणि तो व मिना कायमचीं सुखी झालीं.

हें कथानक लक्षपूर्वक वाचतांना कुणाच्याहि लक्षांत येईल कीं, त्याच्या अखेरींत वाचकांच्या उत्सुकतेला ताण देण्याची विशेष शक्ति नाहीं. नात्सी अधिकाऱ्यांच्या तावडींतून जोसेफ् ज्या ठिकाणीं सुटतो त्या ठिकाणींच वाचकाची उत्सुकता संपते. पुढें पलायन करतांना मिना व जोसेफ् यांच्यावर लेखक एखादं बारीक सारीक संकट आणील हें त्याला माहीत असतं, परंतु तो मनाशीं म्हणतो आतां आला मजकूर ध्यानांत. 'नांदा सौख्यभरें...' 'And so they lived happily ever after.' यामुळें कादंबरीची चवेचाळीस ते बावन्न हीं नऊ प्रकरणं पाल्हाळासारखीं वाटतात. अधिकाऱ्यांसमोरील चौकशीच्या वेळचे व नंतरचे सुमारें एक वर्षाच्या तुरुंगवासांतले

जोसेफचे हाल सांगणारीं तीस ते पस्तीस हीं सहा प्रकरणंहि अशींच गाळण्यासारखीं वाटतात. परंतु हा एकंदर पंधरा प्रकरणांचा कांहींसा पाल्हाळिक भाग दृष्टिआड केला तर हचिन्सनच्या या कादंबरींत अभ्यासण्यासारख्या पुष्कळच गोष्टी आहेत. कथा-रचनेच्या गमती आहेत, स्वभावरेखाटनाची बहार आहे, आणि तंत्रविषयक बारीक कलाकुसर तर ठिकठिकाणीं भरलेली आहे. या सर्व आकर्षणांची मनसोक्त चर्चा करण्याचा मोह मला टाळला पाहिजे. परंतु त्यांपैकीं प्रमुख गोष्टींचं विवेचन आवश्यक आहे.

कथारचनेच्या दृष्टीनं या कादंबरीचा अभ्यास करायचा झाला तर तिच्यांत तीन प्रमुख पेचप्रसंग कसे उत्पन्न केले आहेत तिकडेच नजर टाकली पाहिजे. या पेचप्रसंगांच्या बाबतींत एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे ती अशी कीं, कादंबरींतला पहिला पेचप्रसंग कथानकाच्या ओघांत नक्की कोणत्या ठिकाणीं आणावयाचा याबद्दल सामान्य नियम ठरवितां येणार नाहीं. अगदीं पहिल्याच प्रकरणांत कथानकांतला पहिलाच पेचप्रसंग उभा करून वाचकांची जिज्ञासा उद्दीपित करतां येईल; किंवा कथानकाचा ओघ कांहीं वेळ जरा बेताबातानं अन् संथपणानं वाहूं देऊन, मग किंचित् अकल्पितपणानं पहिल्या पेचप्रसंगाची मांडणी करतां येईल. या दोन पद्धतींपैकीं कोणती स्वीकारायची तें लेखकाच्या योजकते-वरच अवलंबून असतं. हचिन्सननं ‘अग्नि आणि काष्ठ’ या कादंबरींत दुसऱ्या पद्धतीचा उपयोग केलेला आहे.

ही कादंबरी वाचायला आपण प्रारंभ केला कीं आपल्याला कळतं कीं, जोसेफ् आपल्या नोकरीवर रुजू झाला. मग पुढें तो भाड्यानं खोली पाहतो व तिथें त्याचा व मायसेल्चा लहानसा खटका उडतो. पुढे मिनाचं दुखणं त्याच्या लक्षांत येतं व तो तिच्यावर आपले प्रयोग करूं लागतो. इतकी हकीगत

वाचली तरी आतां जवळपास कुठें तरी पेचप्रसंग वावरत आहे अशी आपली कल्पना होत नाहीं. निवेदन एकंदरींत संथपणानं चाललेलं असतं. मिना ही एकच तरुण मुलगी कादंबरीकारानं आपल्यापुढं उभी केली असली तरी तिच्याकडे वाचक विशेष अपेक्षेनं लक्ष देत नाहीं. कारण ती तरुण असली तरी सुंदर नाहीं, सुशिक्षित नाहीं, आकर्षक नाहीं. उलट मोलकरणीचं काम करणारी, संस्कारशून्य, क्षयासारख्या रोगानं पछाडलेली अशी ती एक अडाणी मुलगी आहे. तिच्यावर कादंबरीच्या नायकाचं प्रेम बसेल अशी वाचकाची मुळींच अपेक्षा नसते. परंतु एक दोन प्रकरणं उलटून पुढें जातांच वाचकाला कळतं कीं आपला हिशोब चुकला. जोसेफ्च्या मनांत तिच्याविषयीं मृदु भावना उत्पन्न होऊं लागल्या आहेत. मिना कादंबरीची नायिका आहे! आणि लवकरच वाचकाला हेंहि कळतं कीं मिनादेखील जोसेफ्वर अनुरक्त झालेली आहे! त्या दोघांच्या अंतःकरणांतील हा प्रेमोद्भव वाचकाच्या अपेक्षेच्या पलीकडचा असल्यामुळें त्याला कादंबरींतल्या पहिल्या महत्त्वाच्या घटनेचं स्वरूप कसं आलं आहे ते अवश्य ध्यानांत घेण्यासारखं आहे.

कथानकांतील यापुढचा मोठा प्रसंग म्हणजे जोसेफ् नात्सी अधिकाऱ्यांकडून पकडला जातो तो. या प्रसंगाचीं बीज जरी आधींच्या निवेदनांत असलीं तरी लेखकानं ती इतक्या हलक्या हातानं पेरलीं आहेत, की त्यांचा असा कांहीं संकलित परिणाम होणार आहे अशी वाचकाची कल्पना नसते. उदाहरणार्थ, जोसेफ्चं व मायसेल्चं खोलीवरून झालेलं भांडण. त्या भांडणाचं वर्णन वाचीत असतांना वाचक तर मनाशीं आश्चर्यच करीत राहतो कीं, ही एवढी साधी गोष्ट लेखकानं इतक्या विस्तारानं कशासाठीं सांगितली आहे! याच स्वरूपाचे आणखी

तीन चार छोटे प्रसंग कादंबरींत घातलेले आहेत. ते वाचीत असतां त्यांच्या युक्ततेबद्दल वाचक सारखा साशंकच असतो. मात्र नंतर जेव्हां जोसेफ्‌ला पकडतात व त्याच्यावर ठेवलेले आरोप वाचक वाचतो, तेव्हां एकदम त्याच्या ध्यानांत येतं, कीं कांहींसे अप्रयोजक व अनावश्यक वाटलेले ते छोटे छोटे प्रसंग म्हणजे या शोककारक घटनेची तयारी होती. एकदम साऱ्या गोष्टीं-वर प्रकाश पडल्यासारखं होतं, वाचकाची पूर्वीची शंका नाहींशी होते, व त्याला एक नवीनच समाधान मिळून तो पुस्तक अधिक उत्सुकतेनं वाचूं लागतो.

कादंबरींत कोणतीहि मोठी घटना निर्माण करतांना तिच्यांत अकल्पितपणा असेल ही जशी काळजी लेखकानं घ्यायची, तशीच दुसरीहि घ्यायची असते ती अशी कीं, चकित झालेला वाचक मागच्या कांहीं गोष्टी आठवून पाहील तर त्याला वाटावं, होय, या घटनेचा संभव हलकें हलकें उत्पन्न होत होता खराच! कांहीं झालं तरी संभाव्यतेचा नियम लेखकाला झुगारून देतां येत नाहीं, व त्यासाठीं वर सांगितलेली दुहेरी कसरत त्याला करावी लागते. ही गोष्ट अवघड तर खरीच. परंतु कादं-बरीच्या रसोत्पत्तीचं तें एक मर्मस्थान आहे. या दृष्टीनं प्रस्तुत पुस्तकांतील जोसेफ्‌च्या अटकेचा प्रसंग लेखकानं कसा साधला आहे तें वाचकांनीं मुद्दाम ध्यानांत घ्यावं.

जोसेफ्‌च्या अटकेच्या या प्रसंगांत नाट्य निर्माण करण्यासाठीं हचिन्सननं कसं कसब लढविलं आहे तें पहा. कादंबरीच्या अठ्ठाविसाव्या प्रकरणाची अखेरी होते त्या वेळीं जोसेफ्‌चं व मिनाचं एकमेकांवर आत्यंतिक प्रेम जडल्याचं वाचकाच्या लक्षांत येतं. त्या दोघांच्या परस्परप्रीतीबद्दल आतां यत्किंचित् शंका राहत नाहीं. वाचकाच्या ठिकाणीं त्यांच्याबद्दल पूर्ण सहानुभूति उत्पन्न

होते, व तो स्वतःशीं म्हणूं लागतो हे दोन प्रणयी जीव आतां सदैव सुखांत असोत, त्यांच्या प्रेमांत कसलंहि विघ्न न येवो. आणि वाचक मनाशीं पुरतं असं म्हणतो न म्हणतो तोंच पुढच्याच प्रकरणांत त्यांच्यावर भयंकर संकट येऊन थडकतं! जोसेफ पकडला जातो, त्याची व मिनाची ताटातूट होते, आणि त्या घटनेचं एकंदर स्वरूप इतकं दुष्ट असतं कीं, मिनाला तिचा जोसेफ् पुन्हा भेटेल अशा आशेला यत्किंचित्‌हि अवकाश नसतो. वाचक अधीर वृत्तीचा असेल तर भराभरा पुढचीं पानं चाळून पाहूं लागतो. पुढें केव्हां तरी मिना व जोसेफ् यांची भेट घडली काय?...

ही भेट घडणं हाच कादंबरींतील अखेरचा पेचप्रसंग होय. तो निर्माण करण्यांतहि हचिनसननं कोणत्याहि ठराविक युक्त्यांचा उपयोग न करतां अगदीं नाविन्यपूर्ण कथारचना केली आहे. कशी ती पाहा!

नेहमींची युक्ति वापरायची असती तर हचिन्‌सननं जोसेफ्‌ला तुरुंगांतून पळायला लावलं असतं किंवा अशीच दुसरी कांहीं योजना केली असती. परंतु त्यानं इथें योजलेली युक्ति फारच नवीन व नाट्यपूर्ण अशी मला वाटली. एके दिवशीं जोसेफ्‌ला तुरुंगावरच्या अधिकाऱ्यापुढं उभं केलं गेलं, व तो अधिकारी त्याला म्हणाला, "तूं आजपर्यंत तुझ्यावरचे आरोप हट्टानं कबूल केले नाहींस, पण आतां बघ एका जर्मन मुलीचा प्राणघात करण्याचा प्रयत्न तूं केलास असं आम्ही सिद्ध करतों कीं नाहीं तें! कारण त्या मुलीनंच तुझ्यावर खटला भरला आहे." तें ऐकतांच जोसेफ्‌ची स्थिति विलक्षण झाली. ज्या मिनावर त्यानं अमर्याद प्रेम केलं, जिचे प्राण वांचविण्यासाठीं त्यानं कष्टाची पर्वा केली नाहीं, तिनंच आतां त्याच्यावर खटला भरला होता तर! संपलं! मग आजपर्यंत आपण सत्याचा आग्रह धरून

आपल्यावरचे आरोप नाकबूल केले त्यांत आतां काय अर्थ उरला ! एखाद्या वेडसराप्रमाणें तो अधिकाऱ्याला ओरडून सांगूं लागला, " होय, होय, खरंच सांगतों—शपथेवर सांगतों—तिचा प्राण घ्यायचा मीं प्रयत्न केला. तिचं म्हणणं बरोबर आहे. कबूल आहे माझा अपराध— " आणि वाचक तर या जागीं विस्मयानं थक्कच होतो. त्याला वाटतं, आतां जोसेफ्ला कसली आशा ! मिनानंच त्याच्यावर खटला भरल्यावर मग काय ? पण मिनानं हें केलं कसं ? ती आपल्या प्रेमाशीं इतकी बेइमान झाली ?

म्हणजे जोसेफ्ला निराशेचा व दुःखाचा जेवढा धक्का बसला असेल तेवढाच वाचकाला बसतो. तो विलक्षण उत्सुकतेनं पुढच्या भागाकडे वळतो. आणि ३६ ते ४१ हीं पांच प्रकरणं वाचून काढल्यावर जेव्हां त्याच्या लक्षांत येतं कीं मिनानं जोसेफ्वर खटला भरावा ही जोसेफ्च्या सुटकेची एक युक्ति—नव्हे एकच अमोघ युक्ति होती, तेव्हां त्याला त्या साऱ्या प्रकाराचं विलक्षण कौतुक वाटायला लागतं, आणि जोसेफ्च्या सुटकेची घटना ठराविक साच्याच्या प्रसंगांनी घडवून न आणतां ही नवीनच चित्तवेधक व कमालीच्या कल्पकतेची योजना केल्याबद्दल लेखकाची प्रशंसा केल्यावांचून त्याला गत्यंतर राहत नाहीं. सारांश, या कादंबरींतील तीनहि मुख्य पेचप्रसंग ज्या कौशल्यानं घडवून आणले आहेत तें केव्हांहि प्रशंसनीय म्हणावं लागेल.

आणि कादंबरीच्या कथानकाच्या रचनेत जितकी गंमत आहे तितकीच तिच्यांतल्या स्वभाववर्णनांत आहे. किंबहुना, हें पुस्तक वाचल्यानंतर स्वभाववर्णनाच्या बाबतींत हचिन्सनची लेखणी फार मातबर असली पाहिजे याची अगदीं पूर्ण खात्री पटते. कथानकाच्या ओघांत गौण पात्रं पांच पन्नास सहज आलीं आहेत. इस्पितळांतले डॉक्टर, परिचारिका, गडीमाणसं, खाणावळींत

राहणारे भाडेकरी, सैन्यांतले अधिकारी, अशीं किती तरी माणसं कमी अधिक वेळ वाचकांपुढें येऊन जातात. आणि त्यांपैकीं प्रत्येकाचं चित्र अशा कांहीं सफाईनं लेखकानं काढलेलं आहे कीं तें लवकर डोळ्यांपुढून नाहींसं होणं शक्य नाहीं. त्या त्या स्वभावचित्राच्या वेळीं गांभीर्य, सहानुभूति, उच्छृंखलता, मर्मभेदक विनोद इत्यादि सर्व रंग लेखकानं मोठ्या योजकतेनं वापरलेले दिसतात. अर्थात् त्याचं हें वर्णनकौशल्य मिना व जोसेफ् यांच्या बाबतींत उत्कर्षाला पोंचलं असलं तर त्यांत आश्चर्य कसलं?

या कादंबरीचा विषय बऱ्याच अंशानं बर्नार्ड शॉच्या 'पिग्मॅलियन' या नाटकाच्या (व आतां चित्रपटाच्याहि) विषयासारखा आहे. पिग्मॅलियनमध्यें एका सामान्य फुलवालीची सरदारीण बनविण्याची प्रतिज्ञा एक प्रोफेसर करतो, व तिचं स्वरूप अंतर्बाह्य बदलण्यासाठीं तिला आपल्या घरीं ठेवून घेतो. त्याचा प्रयोग यशस्वी होतो, परंतु प्रयोगाच्या अखेर त्या मुलीचं त्याच्यावर इतकं प्रेम जडलेलं असतं की, त्याचा आपला संबंध संपला असं मानायला ती तयार होत नाहीं. हेंच कोडं हचिन्सननं या कादंबरींत उलट मांडून दाखवलं आहे, नाहीं का? अर्थात् जोसेफ् व मिना यांच्या भावनांची सूक्ष्म क्रांति हाच या प्रेमकथेचा खरा प्राण आहे; आणि दोघांचंहि निरनिराळ्या अवस्थेतील नाजुक मनोगत हचिन्सननं फार रम्य प्रकारें विशद केलं आहे.

मिनाची केस जेव्हां प्रथम जोसेफ् आपल्या हातीं घेतो, तेव्हां तो ही गोष्ट जाणून असतो कीं, आपल्या प्रयोगासाठीं आपण या मुलीचे प्राण पणाला लावणार आहोंत, आपल्या संशोधनांत कदाचित् मिना मरेलहि; परंतु त्या संभवाची त्याला क्षिति वाटत नाहीं. "The individual does not matter" हें त्याचं ध्येयवाक्य असतं. एकंदर मानवजातीच्या कल्याणासाठीं एखाद्या

व्यक्तीचे प्राण घ्यावे लागले तरी तें धर्म्यच ठरेल अशी त्याची खात्री असते. परंतु कादंबरीच्या अखेरीस त्याचं तत्त्वज्ञान बदललेलं असतं. " The individual does not matter, is that true ? It depends which individual......That is one of the hardships in being a Doctor and not being God." किती मार्मिक आहेत हे उद्गार! जोसेफ् परमेश्वर नव्हता, तो एक साधा मानव होता. आणि म्हणूनच ज्या त्याला प्रारंभीं मिनाच्या प्राणांची फिकीर वाटली नाहीं. त्यालाच, प्रेमाची हळुवार दृष्टि उत्पन्न होतांच, मिनाच्या प्राणांची इतकी किंमत वाटूं लागली, कीं त्यासाठीं संशोधन बंद करावंसं त्याला वाटूं लागलं! जोसेफ्च्या भावनांतला हा बदल दाखवितांना हचिन्सननं ठिक-ठिकाणीं जीं सुंदरवर्णनं केलीं आहेत त्यांचं स्वारस्य सांगून पूर्णांशानं कळायचं नाहीं. वाचकांनीं तीं वर्णनं मुळांतच अवश्य वाचावीं.

मिनाचं स्वभावचित्र जोसेफ्च्या बरोबरीनं, कदाचित् अधिकच उठून दिसावं अशा प्रकारें रंगविलं गेलं आहे. ती एक आईबापा-वांचून पोरकी झालेली मुलगी. कुठल्या तरी एका मठाच्या शाळेंत ती थोडंसं शिकली, पण तिथून लवकरच पळाली आणि मग मोल-करणीचं काम करून पोट भरूं लागली. तिच्या ठिकाणीं ना स्वरूप-सौंदर्य, ना सुखासीन आयुष्यक्रमामुळें उत्पन्न होणारं तेज, ना मोठी अक्कल, ना स्त्रीसुलभ चेष्टितांचं लाघव. परंतु जोसेफ्च्या प्रीतीचा स्पर्श होतांच तिच्या जीवितपुष्पांतला सारा सुगंध जागृत होऊन त्याचा दरवळ साऱ्या कथानकभर कसा पसरतो तें अगदीं पाहण्या-सारखं आहे. तिची मुग्धता आणि बालिशता शेवटपर्यंत कायम राहते. परंतु एरव्हीं दोषासारखे वाटले असते असे हे तिचे स्वभावधर्म वाचकाला उलटे मनोरम वाटूं लागतात. कारण

तिनं आपलं जीवित सर्वस्व जोसेफ्च्या चरणावर किती दृढनिष्ठेनं ठेवलं त्याचा तिच्या प्रत्येक लहान मोठ्या कृतींत स्पष्ट प्रत्यय येत असतो. आपल्या प्रियतम जोसेफ्च्या सुटकेसाठीं तिनं काय काय धीट युक्त्या योजल्या त्यांची हकीगत वाचूं लागलं, कीं वाचकांचं हृदय उचंबळून आलंच पाहिजे. आणि जोसेफ्ची सुटका केल्यापासून अखेरपर्यंत तिनं जोसेफ्चा ज्या विलक्षण ममतेनं सांभाळ केला तींत यौवनांतली प्रीति आणि मातृहृदयांतलं वात्सल्य याचं जें विलक्षण मिश्रण दिसून येतं त्यानं वाचकाच्या डोळ्यांत पदोपदीं अश्रू आल्यावांचून राहात नाहींत. अशा मनोज्ञ वर्णनांनीं मिनाचं स्वभावचित्र बनविलेलं आहे.

मात्र मला जर कुणी विचारलं, कीं या कादंबरींतला असा एकच प्रसंग सांगा कीं जो तुमच्या स्मृतींत दीर्घकाल तरंगत राहिला, तर मी म्हणेन, ज्या वेळीं प्रीतीच्या मृदु भावनेच्या आधीन होऊन इंजेक्शनची सर्व तयारी केल्यानंतरहि 'आतां माझ्यानं हें करवत नाहीं' असं जोसेफ म्हणतो व मिना त्याला आपला निश्चय बदलायला लावते तो प्रसंग होय. त्या वेळच्या त्या दोघांच्या संवादाची सगळींच्या सगळीं सात पानं इथें उद्धृत करण्याचा मला फार मोह होतो. उत्कृष्ट प्रासादिक ललित-वाङ्मयाचा तो एक नमुना खचित आहे. पण त्या संवादांतला फक्त अखेरचा भाग मी सांगतों.

मिना जोसेफ्ला विचारते, "मला इंजेक्शन द्यायचं बंद करून तूं काय करशील? औषधाचा गुण कुणावर पाहशील? दुसरी एखादी व्यक्ति हातीं घेशील?"

"असं वाटतं."

"दुसरी एखादी मुलगी?"

"कुणास ठाऊक! औषधांची प्रतिक्रिया स्त्रियांच्यावर चटकन्

होते. परंतु नाहीं. दुसरी मुलगी नको मला. बघेन एखादा म्हातारा रोगी मिळाला तर."

" अन् पुन्हा पहिल्यापासून सुरुवात करशील?"

" होय."

" म्हणजे माझ्यावर जो वेळ घालविलास तो फुकट जाणार तर?"

" होय, तसंच म्हटलं पाहिजे."

" पण असं काय म्हणून? माझ्या प्राणांची मला पर्वा वाटत नाहीं."

" पण मला वाटते." जोसेफ् म्हणाला.

तिचा हात हलकेच त्याच्याकडे सरकला तें त्याच्या लक्षांत आलं नव्हतं. तिनं जेव्हां त्याची बाही ओढली तेव्हां तो थोडासा दचकला. ती रडूं लागली. पण ऐकणाऱ्याला आश्चर्य वाटावं इतक्या दृढ स्वरांत ती म्हणाली,

" ऐक, माझं ऐक. तुझे प्रयोग तुला पुरे करतां यावेत यासाठीं काय वाटेल तें झालं तरी माझी तयारी आहे. तुला हें केलंच पाहिजे. आजपर्यंत तूं माझ्या अंगांत तें भयंकर विष घातलंस; मीं यातना सोसल्या. माझं शरीर त्यानं जळालं. आतां माझं ऋण तुला फेडलंच पाहिजे."

" तुझं ऋण?" जोसेफ् आश्चर्यानं उद्गारला.

" होय. तुझ्या या प्रयोगांत माझा वांटा आहे अन् तो मला भरपूर मिळाला पाहिजे. दुसऱ्या कुणावर तूं प्रयोग केलेस, अन् ते यशस्वी झाले तर माझी वाट काय? मी नुसती अशीच जन्मभर पडून राहूं होय? नाहीं. मी तुला सांगतें बघ, हा प्रयोग जितका तुझा आहे तितकाच माझाहि आहे. त्याच्या सिद्धीसाठीं मीं काय काय भोगलं तें लक्षांत आण. तें कांहीं

नाहीं, या प्रयोगावर माझा हक्क आहे. तूं अखेर एक व्यक्ति दाखवून जगाला असंच सांगणार ना, कीं ही पहा, हिला मीं क्षयांतून बरी केली ! ती व्यक्ति मीच असली पाहिजे."

जोसेफ् म्हणाला, "मिना ! मिना, तुला कळत नाहीं का ?— तुला कसं सांगू—आजच्या या इंजेक्शननं तूं कदाचित् मरशीलहि."

"मी मरेन हें तर तुला पहिल्यापासून माहीत होतं !"

"होय, पण त्यावेळीं माझ्या भावना निराळ्या होत्या. आतां मला तूं प्रिय आहेस, मला प्रयोगाची पर्वा नाहीं. मला तूं हवीस."

ती क्षणभर स्तब्ध राहिली आणि नंतर अगदीं शांत स्वरांत तिनं विचारलं,

"मग मला जें हवं तें तूं कां करीत नाहींस ?"

"मी वाटेल तें करीन, पण तुला मरूं देणार नाहीं."

"पण मी मरणार नाहीं. नाहींच मरणार." असं उद्गारतांना तिनं त्याच्या दंडावरचीं आपलीं बोटं घट्ट दाबलीं. जणुं मृत्यूशीं झगडण्याची केवढी शक्ति आपल्या अंगांत आहे तें तिला दाखवायचं होतं. "जोसेफ् ! जोसेफ्, मला एकच गोष्ट हवी आहे. तूं आपल्या प्रयोगांनीं जिला बरी करशील अन् अभिमानानं जगाला दाखवशील ती मी असली पाहिजे. ज्याचा अभिमान वाटावा असं आजपर्यंत माझ्या आयुष्यांत मला कांहींच मिळालं नव्हतं. जी माझा अभिमान धरते अशी व्यक्तीहि मला लाभली नव्हती. पण आतां तसं नाहीं. मला कीर्ति मिळवावीशी वाटते असं भलतंच समजूं नकोस. कीर्ति, यश, सगळं कांहीं तूं घे; परंतु जी पायरी चढून तूं वर जाशील ती पायरी मला होऊं दे. एवढं एकच माझं मागणं आहे !"

मग जोसेफ्नं तिला इंजेक्शन दिलं. ते देतांना तो प्रार्थना करीत होता. 'माझी मिना मरतां कामा नये, तिचे प्राण सुखरूप

राहिले पाहिजेत.' आणि ती मात्र पूर्वीप्रमाणें मागं उशीवर डोकं टाकून स्वस्थ पडण्याऐवजीं मान उंचावून, डोळे चक्क उघडे ठेवून दंडात शिरणाऱ्या सुईकडे अविचल मुद्रेनं पाहत होती !

त्याच क्षणीं—ज्या क्षणीं त्यानं सुईचं अग्र तिच्या दंडाच्या कातड्याखालीं दाबून धरलं होतं त्या क्षणीं– तिच्या ओठांचा स्पर्श त्याच्या लक्षांत आला. त्याच्या मानेवर तिनं आपले सुकुमार ओठ टेंकले होते. जोसेफ्नंहि उलट उत्तर दिलं. सुई बाहेर काढल्यावर तिच्या दंडाच्या त्या भागावर त्यानं आपले ओठ अलगद टेकले. त्यांच्या कोमल प्रीतीचा हा पहिलाच उघड आविष्कार होता ! हेंच त्यांचं पहिलं विचित्र आलिंगन होतं !

---

## २ : : सुखाचा बदला

"कादंबरीकार काय किंवा नाटककार काय, त्यांच्या कल्पना-सृष्टींतल्या स्त्रीपुरुषांना सौंदर्याची देणगी हमखास मिळालेली असायचीच. असं काय म्हणून?" अशी टीका मधून मधून झालेली आपण ऐकतों. या टीकेला लेखकांच्या बाजूनं उत्तर देतां येईल. परंतु या ठिकाणीं लेखकांपेक्षां टीकाकाराचा पक्ष मी घेऊं इच्छितों. ललित-वाङ्मयांतले झाडून सारे नायक व नायिका एक जात स्वरूपसुंदर असाव्यात यांत वास्तवतेच्या दृष्टीनं तर वैगुण्य वाटण्यासारखं आहेच; परंतु शिवाय रंजकतेच्या दृष्टीनं देखील यांत उणीव भासणं अपरिहार्य आहे. जी कादंबरी वाचायला घ्यावी तिची नायिका आपली देखणी असा प्रकार झाला म्हणजे त्या देखणेपणाचा वाचकाला कंटाळा येऊं लागतो. रसिकाचा देखील रुचिपालट झाला पाहिजेच ना!

शिवाय असाहि एक विचार सुचल्यावांचून राहत नाहीं कीं ललितकृतींत अंतर्भूत करण्यासारख्या घटना काय फक्त सुंदर माणसांच्याच आयुष्यांत घडतात! ज्यांना निसर्गानं सौंदर्य दिलं नाहीं अशा स्त्रियांच्या जीवितांत विस्मयकारक प्रसंग काय येतच

नाहींत ? किंबहुना, त्यांच्या ठिकाणची कुरूपता हीच एक विलक्षण घटना नाहीं काय ? सौंदर्याच्या अभावामुळें माणसाला जीवितांतल्या सुखांना ज्याप्रकारें मुकावं लागतं तो प्रकार, स्वतःच्या अंगीं आकर्षण नसल्यामुळे त्या व्यक्तीच्या ठिकाणीं उत्पन्न होणारी कनिष्ठतेची व एकटेपणाची जाणीव, त्या व्यक्तीच्या ठिकाणीं हळूहळू उद्भवणारी जगाबद्दलच्या तक्रारीची व द्वेषाचीसुद्धा भावना, व या सर्व प्रकारांतून त्या व्यक्तीच्या आयुष्यांत ओढवणारे बहुतांशीं दुःखाचे, क्वचित् सुखाचे प्रसंग— यांची रम्य कथा बनवितां येणार नाहीं ?

अवश्य येईल. आणि ज्या कादंबरीबद्दल मी आतां माहिती सांगणार आहे ती अशाच स्वरूपाची एक कथा आहे. या कादंबरीचं नांव "Pay Thy Pleasure" असं आहे. ( प्रकाशकः—फेबर ॲन्ड फेबर ). या कादंबरीच्या लेखिकेचं नांव "एलिझाबेथ इंग्लिस-जोन्स" असं आहे. या कादंबरीचा दर्जा फार वरचा नाहीं हें मला प्रथमच स्पष्टपणें सांगितलं पाहिजे. निरनिराळ्या दृष्टींनीं जिचा अभ्यास करावा अशी ही नाहीं. परंतु हिच्यांत जे एकदोन गुण मला आढळले त्यांचं मात्र विवेचन मला करावंसं वाटतं. माझ्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें प्रथम कादंबरीचं कथानक सांगतों, म्हणजे नंतरची चर्चा वाचकांच्या नीट लक्षांत येईल.

'कारशॅम' गांवीं टॉमस गर्लिग नांवाचा एक वकील होता. आपल्या धंद्यांत मोठा निष्णात होता तो. पैसाहि खूप मिळवीत असे. पण वयाच्या ३८ व्या वर्षापर्यंत तो अविवाहित राहिला होता. त्या गोष्टीचं गांवांतल्या साऱ्या लोकांना मोठं आश्चर्य वाटे, आणि त्याच्या गळ्यांत आपापल्या उपवर मुली, पुतण्या, भाच्या अडकविण्याची परोपरीनं धडपड करणाऱ्या

गांवांतल्या उद्योगी म्हाताऱ्या बायकांनीं तर त्याची केस 'होपलेस' म्हणून सोडून दिली होती.

परंतु मग अकस्मात् एक आश्चर्य घडलं!

एका सुटीमध्यें टॉमस गॅलिंग स्वित्झरलंडची हवा खाण्यासाठीं म्हणून जो गेला तो लग्न करून परत आला. त्याच्या बायकोचं नांव 'रोझेटा'. त्याचं लग्न झालेलं पाहून पुष्कळांना संतोष वाटला, पण पुष्कळांच्या जिभा सैल सुटल्या. गांवांतल्या ज्या म्हाताऱ्या बायांची डाळ गॅलिंगनं शिजूं दिली नव्हती त्यांच्या टीकेला तर आतां अगदीं आधण आलं. गांवांतल्या कुटाळक्यांचा अभिप्राय असा दिसला कीं गॅलिंगला हें लग्न कांहीं सुखाचं होणार नाहीं. कारण एक तर नवरा-बायकोच्या वयांत केवढं अंतर! टॉमस ३८ वर्षांचा तर रोझेटा अवघी १८ वर्षांची! बरं ही मुलगी तरी एखाद्या खानदानी, उच्च इंग्रज कुळांतली होती काय? लोकांना असा दाट संशय होता कीं तिच्यांत इटालियन् किंवा स्पॅनिश रक्त असलं पाहिजे. रोझेटाच्या वर्तनांतला अफाटपणा पाहिला कीं हा संशय खरा वाटे. ती फार देखणी होती व आल्या गेल्याचा आदर-सत्कार हौसेनं अन् सढळ हातानं करी, त्यामुळे गांवांतल्या पुरुषांना ती साहजिकच प्रिय झाली. पण बायका तिच्याविषयीं नाहीं नाहीं तें बोलत. आणि तिच्या सहवासांत स्वतः टॉमस गॅलिंग जेव्हां अगदीं रंगून गेल्याचं त्यांना दिसे तेव्हां तर त्यांचा जळफळाट होई.

रोझेटाला मुलगी झाली तिचं नांव 'एस्थेर'. तिचे लाड करतांना रोझेटा पैसा पाण्यासारखा खर्च करूं लागली. एखाद्या राज-कन्येची नसेल अशी छोट्या एस्थेरची बरदास्त होती. ती दिसायला आपल्या आईसारखीच दिसे, आणि आईसारखीच ती मोठेपणीं वागणार असं भविष्य लोक करीत. विवाहित आयुष्याची

पांच वर्षें टॉमस व रोझेटा यांनीं अगदीं सुखाच्या कडेलोटांत काढलीं.

आणि मग अकस्मात् एक भयंकर गोष्ट घडली.

टॉमस गर्लिगनं आतां स्विट्झरलंडमध्यें स्वतःचा एक बंगलाच केला होता. एका सुटींत त्या बंगल्याला आग लागली. एस्थेरला वांचविण्याच्या प्रयत्नांत रोझेटा जळून मेली, आणि एस्थेरचे प्राण जरी वांचले तरी तिचा ओठ कापला गेला आणि साऱ्या तोंडावर जळके डाग राहिले !

येथपासून एस्थेरच्या आयुष्याची तऱ्हा एकदम निराळी झाली. आपली लाडकी रोझेटा मृत्युमुखीं पडली ती एस्थेरमुळें; या समजुतीनं टॉमस गर्लिग तिचा अगदी द्वेष करूं लागला. एखाद्या वेळीं ती लहान मुलगी हट्ट करूं लागली तर तिला चाबकानं फोडण्यापर्यंत त्याच्या निष्ठुरतेची मजल गेली. चेहरा विद्रूप असल्यामुळें समवयस्क मुलांत मिसळणं किंवा शाळेंत जाणं असल्या गोष्टीदेखील एस्थेरला मनस्तापाच्याच होऊं लागल्या.

ती वयानं वाढली, परंतु सामान्य मुलींहून किती निराळं आयुष्य तिच्या वांट्याला आलं! तिचं लग्न होणं तर शक्यच नव्हतं. एकच मार्ग तिला उरला होता आणि तो तिनं पत्करला. बापाचं घर तिनं संभाळलं. परतु टॉमस तिला धड पुरते पैसेहि देत नसे. घराची व्यवस्था ती कशीबशी संभाळी. पाहुण्यांचा आदर-सत्कार, इष्टमित्रांचा सहवास, ख्याली-खुशाली, मौज, चैन या गोष्टींपासून सर्वस्वीं अलिप्त असं एस्थेरचं आयुष्य होतं. या उदास आयुष्यांत तिच्या मनाला विरंगुळा देणारी एकच गोष्ट होती. ती सुरस प्रेमकथांचीं पारायणं करीत असे !

अशा प्रकारें एस्थेरच्या आयुष्याचीं पंचेचाळीस वर्षें उलटलीं. आणि अशाच प्रकारे कुजत असतां आपण एक दिवस मरणार

अशी तिनं आपल्या मनाशीं खूणगाठ बांधून ठेवली असली पाहिजे.

पण मग एकदम तिचं दैव उघडलं!

तिचा बाप मेला, आणि त्यानं आपल्या मृत्युपत्रांत आपली सारी दौलत एस्थेरच्या नांवानं लिहून ठेवली. एस्थेर एकदम खूप मोठ्या संपत्तीची मालकीण झाली.

पूर्वीच्या साऱ्या विपत्तींवर सूड घ्यायचं एस्थेरनं ठरविलं. तिच्या जन्मभूमींत दारिद्य, दुःख, उपहास, अवमान यांखेरीज दुसरं कांहीं तिच्या वांट्याला कधीं आलं नव्हतं. त्या गांवचं आणि तिथल्या लोकांचं दर्शनसुद्धां तिला नको होतं. तिनं बापाची सारी स्थावर इस्टेट विकून टाकली, आणि पश्चिम वेल्सच्या भागांत एका गांवीं एखाद्या किल्ल्यासारखा शोभणारा बंगला आजूबाजूच्या जमीनजुमल्यासकट व पूर्वीच्या मालकाच्या गाई-घोड्यांसकट तिनं विकत घेतला, पाण्यासारखा पैसा खर्च करून तो सजविला, आणि ती त्या ठिकाणीं राहूं लागली. मात्र इथंहि समाजात मिसळण्याची तिची बिलकूल इच्छा नव्हती. आपल्या कुरूपतेमुळें लोकांकडून अवहेलना आणि मानहानि यांखेरीज दुसरं कांहीं मिळणार नाहीं हें तिला पक्कं माहीत होतं. बंगल्यापुढच्या विस्तीर्ण वृक्षराजीच्या तोंडाशीं जें फाटक होतं तें भला मोठा लोखंडी लंगर अडकवून तिनं बंद करून टाकलं, "खासगी! परवानगीवांचून आंत येण्याची सक्त मनाई आहे" अशी पाटी तिथें लावली आणि कुत्रीं, घोडे, गाई, पक्षी, मासे व दोन इमानी नोकर यांच्या सहवासांत ती कालक्रमण करूं लागली.

परंतु हा अत्याचार निसर्ग किती दिवस सहन करणार? ती एखादे वेळीं बाजार-हाटासाठीं गांवांत गेली कीं, गांवांतले व आजूबाजूच्या खेड्यांतले लोक तिला दिसत. त्यांच्याकडे पाहिलं

कीं तिला वाटे, " Happy people, with homes and children." ( किती सुखी हे लोक! यांना मुलंबाळं आहेत, यांचे संसार आहेत ! ) आपल्या ऐश्वर्यसंपन्न घरांतहि तिला चैन पडेनासं झालं. आणि या तिच्या वाढत्या वृत्तीचा परिणाम व्हायचा तो झालाच.

तिच्या बंगल्यापासून कित्येक मैलांच्या अंतरावर दुसरी एक मोठी इस्टेट होती. त्या इस्टेटीवरील बंगल्याचं नांव 'मायरिअन पार्क.' या इस्टेटीचा मालक 'लेविस गॉवर' हा मोठा पटाईत शिकारी म्हणून नांवाजलेला होता. स्वारी पक्की चंगीभंगी होती. असलीं माणसं कर्जबाजारीं असायचीं हें ठरलेलंच, आणि तसाच लेविस गॉवरहि होता. परंतु मोठा मिष्ठास बोलणारा आणि साखर पसरणारा ! कांहीं एका प्रसंगानं याचा एस्थेरच्या बंगल्यांत प्रवेश झाला, आणि पुरुषाच्या सहवासाला भुकेलेली एस्थेर त्याच्या जाळ्यांत झपाट्यानं अडकूं लागली.

लेविस गॉवरची पत्नी जिवंत आहे व त्याला चार मुलगे आहेत हें एस्थेरला कळायला वेळ लागला नाहीं. तो पत्नीशीं काडीमोड करून आपल्याशीं विवाह करील हें शक्य नाहीं हें ती पक्कं जाणून होती. आणि तरीसुद्धा त्याचा मोह तिला कांहीं केल्या सोडवेना. ती त्याच्यावर सर्वस्वीं लुब्ध झाली होती, व हलके हलके तो जरी तिच्याशीं लबाडीनं व दुष्टपणानं वर्तन करूं लागला तरी तिनं आपली निष्ठा बिलकूल सोडली नाहीं.

एस्थेरच्या या अगतिकत्वाचा लेविस गॉवरनं अगदीं निर्दय-पणानं भरपूर फायदा घेतला. तिची सर्व संपत्ति त्यानं लाटली. त्याची चैन चालावी म्हणून आपल्या जमिनी, गाई, घोडे, खुशाल विकून टाकायला एस्थेरनं मागंपुढं पाहिलं नाहीं. तिच्या

प्रेमाची दृढता असामान्य होती; लेविसची स्वार्थबुद्धि व निर्दयताहि असामान्य होती.

अवघ्या सहा वर्षांच्या अवधींत एस्थेरची सारी श्रीमंती लयाला गेली. राहत्या बंगल्यापलीकडे तिचं असं जवळ जवळ कांहीं उरलं नाहीं आणि ज्याच्यासाठीं तिनं ती विपात्ति आपल्यावर ओढवून घेतली तो लेविस गॉवर तिचा परित्याग करून देशाटनासाठीं म्हणून खुशाल चालता झाला.

सुमारें एक वर्षानंतर लेविस आपल्या इस्टेटीवर परत आला. मध्यंतरीं त्याची बायको मरण पावली होती, आणि 'लेटी' नांवाच्या एका चोवीस वर्षांच्या तरुण मुलीशीं लग्न लावून तिला घेऊन तो घरीं आला होता.

लेटीनं त्याच्याशीं लग्न केलं होतं तें अर्थातच दोन कारणांनीं. एक, आपण आतां यापुढे कायमच्या अविवाहित तर राहणार नाहीं अशी जी भीति प्रौढ कुमारिकांना वाटूं लागते ती तिला वाटूं लागली होती. आणि शिवाय लेविसनं तिला मोठ्या ऐश्वर्याच्या भुलथापा दिल्या होत्या. लेविसच्या घरीं आल्यावर मात्र थोड्याच दिवसांत लेटीचे डोळे उघडले. पूर्वी आपल्या नवऱ्याचे व एस्थेर गर्लिंग नांवाच्या स्त्रीचे निकट संबंध असले पाहिजेत याबद्दलचाहि तिचा संशय हलके हलके दृढ होऊं लागला. तिला नवऱ्याबद्दल अगदीं तिरस्कार वाटायला लागला.

लेविस एका तरुण पोरीशीं लग्न करून परत आलेला आहे ही बातमी एस्थेरला कळायला कांहीं वेळ लागला नाहीं. तिची अवस्था आतां अगदींच कठीण झाली होती. तिला दारिद्र्यांत तर दिवस काढावे लागत होतेच, आणि तिचं वयहि आतां खूपच झालं होतं, परंतु ज्या पुरुषावर तिनं प्राणापलीकडे प्रेम केलं त्याच्या बदमाशीचा जो धक्का तिला बसला तो जबरदस्त होता.

आधींच कुरूप असलेला तिचा देह भेसूर दिसूं लागला होता. तिचे एकूण एक केस साफ पांढरे झाले होते. लेविस किती निर्घृण आहे हें एस्थेरला माहीत नव्हतं काय? पण आशा मोठी वेडी असते. अजूनहि तिला वाटे, आपल्या समाचारासाठीं म्हणून का होईना, क्षणभर का होईना, पण लेविस एकदां तरी आपल्याकडे येईल. वाट पाहून पाहून तिनं नोकराकडून त्याला निरोपदेखील पाठविला. पण तो दुष्ट पुरुष तिला भेटला नाहीं.

अखेर एस्थेरनं निश्चय केला कीं, आपण जावं. त्याप्रमाणें ती घडपडत गेली. त्याची नवी वधू लेटी हिच्याबद्दल मत्सरापेक्षां दयाच तिला वाटत होती, त्यामुळें ती एस्थेरला भेटली व तिनं एस्थेरला आपल्या खोलींत प्रेमानं नेलं, तेव्हां लटीबरोबर ती मोठ्या गोडीनं संभाषण करूं लागली. ती लेटीला पुनः पुन्हा विचारूं लागली, "तूं इथं सुखांत आहेस काय?" आणि गहिवरून हुंदके देण्यापलीकडे लेटी तिला काय सांगणार?

त्या दोघी अशा प्रकारें बसल्या असतांना लेविस खोलींत आला. एस्थेरला पाहतांच तो स्तंभितच झाला. आश्चर्याचा भर ओसरल्यावर तो तिला अद्वातद्वा बोलूं लागला. लेटीबद्दलहि अत्यंत घाणेरडे शब्द उच्चारण्यास त्यानं प्रारंभ केला. एस्थेरचा संताप अनावर झाला आणि अखेर लेविस जेव्हां तिच्या अंगावर धावून गेला तेव्हां जवळच कोपऱ्यांत उभी असलेली बंदूक तिनं उचलली अन् त्याच्यावर झाडली!

आपण काय केलं हें तिच्या पुरतं लक्षांत यायला जरा वेळ लागला. परंतु तें येतांच तिनं खोलींतून बाहेर धूम ठोकली व वृक्षराजींतून पळतां पळतां स्वतःवरहि बंदूक उडवून टाकली!

कथानक संपलं. तें वाचतांना वाचकांच्या लक्षांत आलंच असेल

कीं, त्यांत एकंदर चार किंवा पांच मुख्य टप्पे आहेत असं म्हणतां येईल. ज्याला मी नेहमीं 'पंचप्रसंग' असा शब्द वापरतों त्याचाच टप्पा या साध्या शब्दानं बोध होईल असं मला वाटतं. कोणत्याहि कादंबरीच्या कथानकाचा ओघ कांहीं वेळ एकाच तऱ्हेनं वाहून एखाद्या टप्प्यापर्यंत पोचतो, व तिथ आल्याबरोबर त्याला अकल्पित असं कांहीं तरी नवं वळण मिळतं. या नव्या वळणामुळें कादंबरींतल्या मुख्य पात्रांचं दीर्घकाल भोगलेलं दुःख संपून त्यांना सुखाचे दिवस येतील किंवा उलट त्यांचं सुख संपून दुःख सुरू होईल. या दोहोंपैकीं कांहीं तरी एक ज्या स्थलीं होतं, त्याला टप्पा म्हणायला कांहीं हरकत नाहीं. प्रस्तुत कादंबरींत असे प्रमुख टप्पे आहेत कीं नाहीं पाहा.

प्रथम एस्थेरचीं बाळपणचीं पांच वर्षे असामान्य सुखांत गेल्याचं वर्णन आपण वाचतों. पण मग तिची आई मरते, आणि अधिक दुर्दैवाची गोष्ट अशी की, ती स्वतः विद्रूप होते. येथून तिच्या दुःखाला प्रारंभ होतो. आयुष्याच्या पंचेचाळिसाव्या वर्षापर्यंत ती सर्वस्वीं निराशेच्या अंधःकारांत दिवस काढते. परंतु मग एकदम प्रकाश येतो. तिचा बाप मरतो व ती एकदम मोठ्या दौलतीची मालकीण होते. या टप्प्यानंतर कथानकाला थोडा संथपणा येतो न येतो तोंच लेविस गॉवर प्रविष्ट होतो, व कथानक नवा टप्पा ओलांडून नव्या वेगानं वाहूं लागतं. परंतु एस्थेरच्या आयुष्यांत उत्पन्न झालेला प्रणयाचा आनंद निर्भेळ नसतो व सहा वर्षांच्या अवधींत ती सर्वस्व घालवून बसते. लेविसनं तिचा त्याग केल्यावरचं पुढील कथानक लेखिकेला असंहि दाखवतां आलं असतं कीं, तो पुन्हा कधींच एस्थेरला भेटला नाहीं, ती बिचारी झुरणीस लागून अखेर मृत्युवश झाली. परंतु लेखिकेनं त्याला परत आणलं आहे. त्याची व एस्थेरची पुन्हा गाठ पडली आहे व तिच्याकडून

लेविसची व स्वतःची हत्या घडविली आहे. कथानकांतला हा अखेरचा अकल्पित प्रसंग होय.

आणि थोडा विचार केला तर लेखिकेनं योजलेली ही अखेरीच परिणामकारक व सुसंगत आहे असं वाचकांच्या ध्यानांत यायला कांहीं हरकत नाहीं. कारण कादंबरीचं नांव काय आहे तें पाहा. "Pay Thy Pleasure"! याचं भाषांतर मीं केलं आहे 'सुखाचा बदला' या कादंबरींत सुखाचा बदला कुणाला द्यावा लागतो? या प्रश्नाचं उघड उत्तर हें कीं, कथानकांत ज्या तीन प्रमुख व्यक्ती आहेत त्या तिघींनाहि—एस्थेरला, लेविसला आणि लेटीला. लेटी हें गौणपात्र आहे म्हटलं तर, एस्थेर व लेविस यांना लेविस एस्थेरला टाकून गेला तो कायमचा गेला व एस्थेर झुरून झुरून मेली असं लेखिकेनं दाखविलं असतं तर सुखाचा बदला फक्त एस्थेरकडूनच दैवानं घेतला, आणि लेविस सफाई सुटून चैनींत राहिला असं झालं असतं. म्हणजे स्त्रीनं निस्तरावं व पुरुषानं सफाई सुटावं या जुन्या संकेताप्रमाणें कादंबरीचं स्वरूप झालं असतं. ते टाळल्यामुळे कथानकाला नवेपणा आला आहे व शिवाय त्यांत न्यायाचा भाग अधिक उत्पन्न होऊन पुस्तकाच्या नांवाला पूर्ण सार्थकता आली आहे.

लेविसचा अखेर खून होतो एवढ्याच अर्थानं त्याला सुखाचा बदला द्यावा लागत नाहीं हें वाचकांनीं विशेष लक्षांत घ्यावं. तेवढीच घटना कादंबरींत असती तर मीं तिची प्रत फारशी वर लावली नसती. लेखिकेचं विशेष कौतुक करावंसं मला वाटतं तें यासाठीं कीं, लेविसला सुखाचा बदला ज्या तऱ्हेनं तिनं द्यायला लावलेला आहे तिच्यांत मानसशास्त्राचा गमतीचा खेळ आहे. कसा तो पाहा. जो लेविस गॉवर एस्थेरशीं सर्वस्वीं खोट्या प्रेमानं आणि पशुतुल्य स्वार्थी हेतूनं वागला त्याच्यावर प्रीतीनंच

सूड घेतलेला आहे. एस्थेर त्याच्यावर प्रेम करीत होती, पण त्यानं तें झिडकारलं. आणि अंतःकरणपूर्वक केलेलं प्रेम झिडकारलं गेलं कीं, माणसाचा कसा तळतळाट होतो त्याचा अनुभव अखेर त्यालाहि घ्यावा लागला. लेटी तरुण होती. तिची प्रीति त्याला हवी होती. आयुष्यांत प्रथमच प्रामाणिक अनुरक्ति त्याच्या ठिकाणीं उत्पन्न झाली होती. परंतु लेटीचं प्रेम त्याला बिलकूल मिळालं नाहीं. उलट तिचा तीव्र तिरस्कार मात्र त्याला अनुभवावा लागला. त्याची ती अनुकंपनीय दशा लेखिकेनं एक दोनच प्रसंगांत पण चांगली दर्शविली आहे. त्यानं लेटीला आपल्या बाहुपाशांत घट्ट पकडावं, तिचीं चुंबनं घ्यावीं, "Kiss me; Letty, kiss me!" अशी तिची प्रार्थना करावी, परंतु तिनं तसं करूं नये. हें दाखविविण्यांत लेखिकेचा उघड हेतु हा कीं, ज्या यातनांच्या डागण्या त्यानं एस्थेरच्या अंतःकरणावर खुशाल दिल्या त्या शेवटीं त्याच्याहि वांट्याला आल्या. एस्थेरपासून त्यानं सर्व प्रकारची मजा लुटली खरी; परंतु दैवानं त्याच्याकडून सुखाचा बदला भरपूर घेतला!

एस्थेरच्या आयुष्यांतील सुखदुःखांचीं आंदोलनं तर फार परिणामकारक रीतीनं दाखविलीं गेलीं आहेत व कांहीं कालच तिच्या वांट्याला आलेल्या सुखाचा जो विलक्षण बदला तिला द्यावा लागला त्याची हकीकत विलक्षण हृदयद्रावक वाटते. कथानकांतील जे मुख्य टप्पे म्हणून वर सांगितले ते एस्थेरच्याच सुखदुःखक्रमांतील टप्पे आहेत व त्यामुळें त्यांचं चित्रण विशेष प्रयत्नानं लेखिकेनं केलेलं आहे. मीं प्रथमच म्हटलं कीं, दुर्दैवानं विद्रूपपणा जिच्या वांट्याला आला अशा एस्थेरचं आयुष्य कादंबरीचा विषय म्हणून निवडून लेखिकेनं आपल्या कृतींत नावीन्याचं आकर्षण निर्माण केलं आहे. हा विषय निवडल्यानंतर लेखिकेचं कार्य इतकंच उरतं कीं, एस्थेरच्या परिस्थितींत जे जे बदल तिनं घडविले त्या

त्या अवस्थांतरांतील एस्थेरच्या मनाची प्रतिक्रिया कौशल्यानं रंगाविणं. हें कार्य लेखिकेनं उत्तम तऱ्हेनं पार पाडलं आहे, व कांहीं ठिकाणचीं तिचीं वर्णनं विशेष सरस वठलीं आहेत. बालपणीं एस्थेरचे झालेले लाड, नंतर विद्रूपता आल्यापासून बापाची व जगाची तिच्याशीं झालेली वागणूक व तिचे एस्थेरच्या मनावर झालेले कारुण्यपूर्ण परिणाम, बापाच्या मृत्यूनं एकदम श्रीमंती प्राप्त झाल्यावर एस्थेरनं आपल्या आयुष्याला लावलेलं नवीन वळण, तिच्या रूक्ष जीविताला एकदम कुसुमित करून टाकणारा प्रणयाचा उद्‌भव, नंतरची निराशा, तीव्र दुःख आणि अखेरची दुहेरी हत्या, या सर्व घटनांमध्यें सुसंगतीचं, संभाव्यतेचं आणि मानवी भावनांविषयींच्या सहानुभूतीचं जें सूत्र लेखिकेनं ठेविलेलं आहे त्यामुळें या सर्व घटना शास्त्रशुद्ध लकेरींतील सुंदर स्वरांप्रमाणें वाटतात. लेखिकेच्या अंगीं वर्णनाचं सामर्थ्य फार तोकडं आहे. ज्या प्रसंगीं भावनांचा कल्लोळ उठावा त्या प्रसंगीं-देखील लेखिकेचीं वर्णनं उचंबळून येत नाहींत. किंबहुना कथानकांतील प्रसंगांची उंची व लेखिकेच्या वर्णनसामर्थ्यानं गाठलेली उंची यांत मला ठिकठिकाणीं अंतरच आढळलं; तथापि वर्ण्य विषयच जोरकस असला कीं, लेखणीचा दुबळेपणा वाचक विसरूं शकतो. या कारणानं या पुस्तकांतील एस्थेरच्या सुखदुःखांच्या वर्णनांत वाचकाचं चित्त केव्हांहि रमेल असं मला वाटतं.

अशा वर्णनांतील जीं मला विशेष हृद्य वाटलीं, त्यांतलं एकच वाचकांना सांगतों. लेविसचा स्वार्थी, लबाड, दुराचारी स्वभाव एस्थेरच्या लक्षांत येऊनहि त्यानं तिला सोडीपर्यंत एस्थेर त्याच्याशीं निष्ठेनं काय म्हणून वागली, अशी शंका एखादा टीकाकार कदाचित् घेईल. परंतु मला तर वाटतं कीं, ती तसं वागली असं दाखविण्यांत लेखिकेकडून दोष घडला नसून अत्यंत

युक्त व पटण्यासारखीच अशी ती योजना आहे. कारण एस्थेर कशा परिस्थितात मध्य वयापर्यंत पोंचली होती व कोणत्या मनोवृत्तीची स्त्री होती हें आपण विसरतां कामा नये. तिचं अर्धं आयुष्य असं गेलं होतं कीं, कुणाची साधी सहानुभूतीसुद्धां तिला मिळाली नव्हती, कुणाचे गोड शब्द तिनं कधीं ऐकले नव्हते. पुरुषाच्या सहवासाची भूक तिच्या ठिकाणीं वर्षानुवर्षं अतृप्त राहिली असली पाहिजे; त्यामुळें लेविसच्या प्रीतिवचनांतील खोटेपणा माहीत असूनहि त्यांचा मोह तिला अनावर वाटला. मी तर म्हणतों कीं, एस्थेरच्या बाबतींतली ही चमत्कारिक प्रतिक्रिया दाखविण्यांत मानसशास्त्राच्या दृष्टीनं वास्तवतेचा मनोहर उत्कर्ष लेखिकेनं साधला आहे. लेविसच्या सहवासांत आजपर्यंत कधीं न अनुभवलेलं असं सुख एस्थेरला मिळाल्याबरोबर, आणि तिच्या स्वतःच्या मनांत प्रीतीचा उद्‌भव झाल्याबरोबर एस्थेरच्या दृष्टीला जग किती निराळं दिसूं लागलं त्याचं लेखिकेनं केलेलं हें वर्णन पाहा—

"तिला आतां दुसऱ्या कुणाशीं बोलणं चालणं नकोसं वाटायला लागलं. पूर्वी जे उद्योग ती हौसेनं करीत असे त्यांत आतां तिचं मन बिलकूल रमेना. आतां भोंवतालच्या सृष्टीवर कांहीं एका विलक्षण प्रकाशाचा मुलामा चढल्यासारखा तिला वाटूं लागला. तिच्या प्रथमच लक्षांत आलं कीं सृष्टींत दंव-बिंदूंनीं भिजून निघणारीं कुरणं होतीं, सूर्यप्रकाश होता, क्षितिजा-वर संध्याकाळच्या वेळेस विविध रंगांचे भडक शिडकाव उठत होते, वृक्षवेलीवरच्या फुलांफुलांतून सुगंध सांठलेला होता, पक्ष्यांच्या कूजनांत माधुरी भरलेली होती, पानापानांत निसर्गाची विलक्षण कलाकुसर दिसण्यासारखी होती, आणि घनदाट वृक्ष-राजीमधून वाहणाऱ्या प्रवाहांचं संगीत म्हणजे तर एक विलक्षण जादुगिरी होती. आतां ती आपल्या नेसण्या-सवरण्याकडे व चेहऱ्या-

कडे अतिशय लक्ष देऊं लागली. आपले लांबसडक काळे केस हात दुखेपर्यंत ती विंचरीत राही, आणि त्यांकडे टक लावून पाहण्यांत तिला विलक्षण सुख वाटे. तोंडाला परोपरीचीं क्रीम्स आणि पावडर्स लावण्याचे प्रयोग ती करून पाहूं लागली. आरशांत पाहतांना ती पुष्कळदां स्वतःशीं म्हणे, 'आतां माझ्या चेहऱ्यावरचे वण पूर्वींसारखे दिसत नाहींत; या पावडरमुळें तर ते जवळजवळ बुजून गेले.... मी मूळची माझ्या आईइतकीच देखणी होतें, नव्हे काय!... अन् आतांहि माझ्या ठिकाणीं सौंदर्य थोडंसं आहेच'..."

या वर्णनांत कारुण्य किती भरलेलं आहे! जिच्या अंगीं स्वरूप नाहीं अशी स्त्री प्रेमविद्ध होऊन एखाद्या पुरुषाला अंकित करण्यासाठीं आपलं मूळचं रूप परोपरीनं खुलवूं लागते, व स्वतःच्या ठिकाणीं थोडं का होईना पण सौंदर्य असल्याचा आभास निर्माण करून त्यांतच सुख शोधूं लागते तेव्हां तिच्या त्या भोळ्या प्रयत्नांचं वर्णन वाचतांना अंतःकरण सद्गदित झाल्यावांचून राहील काय?

या कादंबरीची चर्चा संपविण्यापूर्वी तिच्यांतील एका विशेषाकडे वाचकांचं लक्ष मला वेधावंसं वाटतं. हा विशेष स्वभाववर्णनाचा किंवा कथानकाच्या रचनेचा नसून निवेदनाच्या तंत्राचा आहे. जी कथा सांगावयाची तिच्यांतील मुख्य मुख्य प्रसंगांची कल्पना मनाशीं पक्की केल्यावर लेखकानं एक महत्त्वाचा विचार करायचा असतो तो हा कीं, एक, दोन, तीन, चार, इतक्या गोष्टी मी वाचकांना दाखविणार आहे; परंतु, निवेदनांत गंमत यावी यासाठीं व वाचकाचं कुतूहल जिंकण्यासाठीं यांपैकीं कोणती गोष्ट मीं प्रथम उघड करावी? हा प्रश्न सर्वस्वीं निवेदनाच्या तंत्राबद्दलचाच खरा; परंतु यावर कादंबरीचं चित्ताकर्षकत्व बऱ्याच अंशानं

अवलंबून असतं. आणि कादंबरीचा आटपशीरपणा व निवेदनांतील मितव्यय या गोष्टीहि त्यामुळेंच साधतात.

प्रस्तुत कादंबरीचंच उदाहरण घेऊं. ही कादंबरी म्हणजे एस्थेरची समग्र जीवितकथा आहे. या जीवितकथेंत कोणकोणते मुख्य मुख्य प्रसंग आले ते वाचकांना आतां माहीत झालं आहे. त्यांनीं एक गमतीचा प्रयोग म्हणून आपापल्या मनाशीं असा प्रश्न करावा, मला ही कादंबरी लिहावयाची झाली तर मी तिचा प्रारंभ कोठून करीन? अमक्या अमक्या आई-बापांच्या पोटीं ती जन्मली, बालपणींच ती विद्रूप झाली, पुढें आयुष्याचीं पंचेचाळीस वर्षे तिनं सर्वस्वीं दुःखांत काढलीं, मग एकदम तिच्या आयुष्यांत बदल झाला, इत्यादि घटना पुढें मांडावयाच्या आहेत; परंतु त्यांपैकीं कोणता प्रसंग वाचकांना प्रथम सांगितला तर बाकीचं निवेदन मला सहज रीतीनं करतां येईल व प्रारंभींच वाचकांची जिज्ञासा उद्दीप्त होईल? माझ्या "प्रतिभा-साधन" ग्रंथांत कथानकाच्या मांडणीच्या दोन पद्धती मीं सांगितल्या आहेत. एक 'अनुलोम' पद्धति व दुसरी 'विलोम'पद्धति. ज्या कालानुक्रमानं गोष्टी घडल्या त्याच अनुक्रमानं त्या सांगतां येतात किंवा त्या कालानुक्रमांतील नंतर घडलेली एखादी गोष्ट आधीं सांगून मागच्या घटनांचा धागा त्या गोष्टीपर्यंत आणून भिडवायचा असंहि करतां येतं.

'सुखाचा बदला' या कादंबरीचं कथानक कोणत्या पद्धतीनं सांगतां येईल, विशेषतः निवेदनाला कशा प्रकारें प्रारंभ केला असतां तो सर्वांत परिणामकारक ठरेल याचा विचार वाचकांनीं अवश्य करून पाहावा, व तो केल्यानंतर या लेखिकेनं कादंबरीचं पहिलं प्रकरण कसं लिहिलं त्याचं पुढच्या परिच्छेदांतील विवेचन वाचावं.

एस्थेरनं लेविसचा खून केला व स्वतःवर गोळी झाडून घेतली

त्यामुळें वृत्तपत्रांत जी खळबळ उडाली तेथपासून लेखिकेनं या कादंबरीला प्रारंभ केला आहे. एक खून आणि एक आत्महत्या येवढी घटना घडल्यावर मग काय विचारतां ? झाडून साऱ्या वृत्तपत्रांचे संपादक जागे झाले, व एस्थेर गॅलिंगच्या चारित्राची जितकी म्हणून हकीगत मिळवितां येईल तितकी मिळाविण्यासाठीं शेंकडों वृत्तपत्रांच्या बातमीदारांचा तिची जन्मभूमि जें कारशॅम गांव त्या गांवावर हल्ला झाला. गांवांतल्या म्हाताऱ्या-कोताऱ्यांना एकदम भाव आला. कारण एस्थेरच्या मातापितरांची व तिच्या बालपणांतल्या हकीगतींची माहिती फक्त त्यांनाच होती. साठी ओलांडलेले माळी, धोबी, वाणी, मोलकरणी यांच्या मुलाखती घेऊन चित्राविचित्र बातम्यांचे मिळतील तेवढे शिळेपाके तुकडे गोळा करण्यासाठीं या बातमीदार कावळ्यांची धाडच त्या गांवावर पडली; आणि एरवीं शांत व संथ वाहणाऱ्या त्या छोटयाशा गांवाचा जीवितप्रवाह एकाएकीं खळबळून गेला !

असा प्रारंभ केल्यामुळें लेखिकेला दोन गोष्टी एकदम साधतां आल्या. पहिली ही कीं, वाचकाची उत्सुकता एकदम जागृत करतां येऊन बातमीदारांच्या टोळधाडीमुळें कारशॅम गांवांत अकस्मात् जी धांदल उडाली तिचं मोठं विनोदपूर्ण वर्णन करण्यास लेखिकेला भरपूर अवकाश मिळाला, आणि शिवाय एकंदर निवेदनाची मोठी काटकसरहि तिला करतां आली. कारण एस्थेरचं पंचेचाळीस वर्षांचं आयुष्य सारांशरूपानं पहिल्याच प्रकरणांत सांगून टाकल्यावर पुढच्या दहा पंधरा वर्षांतलं तिचं चरित्र हाच मुख्य विषय उरला, व कथानकाला एकदम आटोपशीरपणा व बंदिस्तपणा आला. 'मनोहरची आकाशवाणी' या पुस्तकांत 'We Are Not Alone' या कादंबरीची सविस्तर चर्चा मीं केली आहे. तिचा कर्ता 'जेम्स हिल्टन' याला या विलोमपद्धतीची फार

आवड आहे. त्याच्या बऱ्याच कादंबऱ्यांत कथानकाच्या अखेरी-मुळें उडालेली खळबळ पहिल्याच प्रकरणांत सांगितलेली असते. या पद्धतीचा अवलंब केल्यामुळें एलिझाबेथ इंग्लिस-जोन्सच्या प्रस्तुत कादंबरीस विशेष चित्तवेधकता प्राप्त झाली आहे. इतर दृष्टींनीं या कादंबरींतील कोणते गुण विशेष उल्लेखनीय ठरतील त्यांचं विवेचन मीं केलंच आहे. परंतु ज्यांना निवेदनाच्या तंत्राच्या निरनिराळ्या युक्त्या शिकावयाच्या आहेत अशा लेखकांसाठीं मला असं म्हणावसं वाटतं कीं या कादंबरीचं पहिलं प्रकरण सगळ्यांत महत्त्वाचं आहे. इतकं कीं अभ्यासू वाचकांनीं व लेखकांनीं ही कादंबरी मुळांत वाचावयास घेतली तर ती संपविल्या-वर दूर ठेवूं नये; तिचं पहिलं प्रकरण त्यांनीं पुन्हा एकदां काळजी-पूर्वक वाचावं. निवेदनाच्या पुष्कळ खुब्या त्यांना त्यांत सापडतील व कादंबरीच्या वाचनानं त्यांना झालेला आनंद द्विगुणित झाल्या-वांचून राहणार नाहीं !

---

३

# दिव्यचक्षू

आतां ज्या कादंबरीचा परिचय मी वाचकांना करून देणार आहे तिचा याच ठिकाणीं अनुक्रम लावण्याचं एक विशेष कारण आहे. तें असं कीं विषयाच्या दृष्टीनं या कादंबरींत व 'सुखाचा बदला' या कादंबरींत साधर्म्य आहे. त्या कादंबरी-प्रमाणेंच याहि कादंबरीची नायिका स्वरूपाच्या दृष्टीनं एक दुर्दैवी स्त्री आहे. याहि कादंबरींत सौंदर्याच्या अभावीं स्त्रीच्या ठिकाणीं जी न्यून-भावना निर्माण होते व ज्या विकृत एकाकीपणानं एकंदर जगाच्या व्यवहाराशीं तिची प्रतिक्रिया होऊं लागते तिचंच वर्णन वाचकांना आढळेल. मात्र या दोन कादंबऱ्यांतील हें साधर्म्य सोडलं तर बाकीच्या अनेक बाबतींत या दोन ललित-कृतींत मोठी भिन्नता दिसून येईल. आणि म्हणूनच 'सुखाचा बदला' या कादंबरीनंतर या दुसऱ्या कादंबरीचा परिचय वाचकांना करून दिल्यास तो विशेष मनोरंजक व बोधप्रद होईल अशी माझी समजूत आहे.

या कादंबरीचं नांव "Blind Man's Year" असं आहे ( प्रकाशकः— 'कॅसेल' ). या कादंबरीच्या कर्त्याचं नांव 'वॉरिक डीपिंग' असं आहे. अत्यंत आश्चर्यकारक शीघ्र वेगानं

लेखन करणाऱ्या लेखकांत वॉरिक डीपिंगची गणना करावी लागेल. त्याच्या कादंबऱ्यांची संख्या अर्धशतकाची मर्यादा ओलांडून गेली आहे. माझ्या डायरीवरून पाहिलं तर "किटी," "डूम्सडे", "ॲपल्स ऑफ गोल्ड", "मॅड बॅरबारा" इत्यादि या लेखकाच्या आठदहा कादंबऱ्या मीं वाचल्या असाव्यात असं दिसतं; परंतु "ब्लाइंड मॅन्स इअर" ही त्यांपैकीं मला सर्वांत आवडलेली कादंबरी होय. मला ती विशेष कां आवडली याचीं सगळीं कारणं मी यथावकाश सांगणारच आहे. परंतु पहिलं कारण हें कीं, या कादंबरीची नायिका सौंदर्यविहीन आहे, व तिच्या चमत्कारिक मनोविकृतींतूनच ललितकथेला योग्य असा मनोरम विषय डीपिंगनं मोठ्या चातुर्यानं निर्माण केला आहे.

मात्र वॅारिक डीपिंगची ही 'दिव्यचक्षू' कादंबरी 'सुखाचा बदला' या कादंबरीपेक्षां किती प्रकारें वेगळी आहे तें वाचकांनीं अवश्य लक्षांत घ्यावयास पाहिजे. एक तर 'सुखाचा बदला' या कादंबरीप्रमाणें ही कादंबरी एका सौंदर्यविहीन स्त्रीची समग्र जीवनकथा नाहीं, तर तिच्या आयुष्यांतील एकाच वर्षांत घडलेल्या चमत्कृतिपूर्ण गोष्टींची ती एक सुरस हकीगत आहे; दुसरा फरक असा कीं 'सुखाचा बदला' या कादंबरींत स्वभाववर्णनाला जरी बरंचसं महत्त्व लेखिकेनं दिलं असलं तरी घटनाप्रधान ललित-कथांच्या सदरांतच ती टाकावी लागेल; आणि प्रस्तुत कादंबरीची स्थिति तशी मुळींच नाहीं. विशेष नाट्यपूर्ण घटना अशी या कादंबरींत एकच आहे; बाकी सारा खेळ मनोव्यापारांचा आहे. अर्थात् मनोविश्लेषणात्मक असंच हिचं वर्णन करावं लागेल. तिसरा एक फरक आहे तो असा कीं या कादंबरींतलं सारं निवेदन अनुलोम-पद्धतीचं असून तंत्राच्या दृष्टीनं हिच्यांत बारिक सारिक गमती फार थोड्या आढळतील. मात्र या वैगुण्याचा ज्या योगें विसर पडावा

असा एक मोठा गुण या कादंबरींत आहे. तो म्हणजे हिच्यांत अनुस्यूत झालेलं आशावादाचं गंभीर तत्त्वज्ञान. हें तत्त्वज्ञान वाचकांच्या गळीं उतरविण्यासाठीं लेखकानं कोठेंहि व्याख्यानबाजी केलेली नाहीं, तर गोष्टींतील विविध प्रसंगच अशा कौशल्यानं घडवून आणले आहेत, व त्या त्या प्रसंगांचे नायक व नायिका यांच्या मनावर झालेले विशेष परिणाम अशा चतुर संवादांनीं सूचित केले आहेत कीं लेखकाला जें तत्त्वज्ञान प्रतिपादायचं आहे तें वाचकाला सहजासहजीं समजतं व पटतं !

'लान्सलॅाट जिरार्ड' व 'आयरिन जिरार्ड' या दांपत्याला मुलगा मुळींच झाला नाहीं, फक्त तीन मुली झाल्या. त्यांपैकीं सर्वांत धाकट्या मुलीचं नांव त्यांनीं 'रोझॅमंड' असं ठेवलं; परंतु नांव सोनूबाई व हातीं कथलाचा वाळा अशापैकीं या बालिकेची स्थिति होती. तिच्या नांवाचा अर्थ 'गुलाब' असा होता; परंतु वस्तुतः ती दिसायला विद्रूप होती आणि तिचा विद्रूपपणाहि मोठा चमत्कारिक होता. तिच्या चेहऱ्याची एक बाजू देखणी होती, पण दुसरी अशी होती कीं पाहणाऱ्याला एकदम किळस वाटावी. चेहऱ्याच्या त्या सबंध बाजूवर जन्मतःच तांबूस कळकट रंग पसरलेला असा होता. अर्थात् या मुलीच्या लहानपणापासून लोकांचा तिरस्कार तिला अनुभवावा लागला. दुर्दैवानं ती शाळेंत शिकत असतांनाच तिची आई वारली आणि तिचा बापहि लवकर-च मृत्युवश झाला व अशा प्रकारें रोझॅमंडच्या वांट्याला पोरकेपणा आला. मात्र 'सुखाचा बदला' या कादंबरींतील 'एस्थेर'प्रमाणें रोझॅमंड अशिक्षित राहिली नाहीं. उलट तिनं आपलं शिक्षण उत्तम प्रकारें पुरं केलं, एवढंच नव्हे तर ती तारुण्यांत असतांनाच एक अत्यंत लोकप्रिय लेखिका बनली. तिच्या कादंबऱ्यांना इंग्लंडांत व अमेरिकेंत विलक्षण मागणी होती व 'A Pilgrimage

of Pain' या तिच्या कादंबरीचीं तर बहुतेक सर्व भाषांत भाषांतरं देखील झालीं होतीं. मात्र या अपूर्व यशाची व श्रीमंतीची तरुण रोझॅमंडवर जी प्रतिक्रिया झाली ती बहुतांशीं एस्थेरप्रमाणेंच. आपण खऱ्या कोण आहोंत हें जगाला कळूं नये म्हणून ती " डग्लस जिरार्ड " अशा खोट्या पुरुषी नांवानं आपलीं सारीं पुस्तकं लिहीत असे, व जगाचा संपर्क टाळण्यासाठीं ससेक्स परगण्यांतील एक मोठी इस्टेट विकत घेऊन तिथल्या बंगल्यांत आपले दोन नोकर व 'प्रिन्स' नांवाचा एक भला मोठा अल्सेशियन कुत्रा यांच्या सहवासांत एखाद्या जोगिणीप्रमाणें ती आयुष्य कंठीत होती.

ह्याच तिचा जीवितक्रम कदाचित् अखेरपर्यंत चाललाहि असता. परंतु तो अकल्पितपणें बदलणारी एक घटना एके दिवशीं घडली. तिच्या बंगल्याभोंवतालच्या दाट जंगलांतल्या एका झाडावर आदळून एक विमान कोसळून तिच्या इस्टेटीच्या आवारांतच पडलं. विमान जळून खाक झालं. वैमानिकालाहि मोठ्या दुखापती झाल्या. त्याला आपल्या बंगल्यांत नेऊन त्याची प्राथमिक शुश्रूषा करणं रोझॅमंडला भागच होतं. आणि ती शुश्रूषा करीत असतांनाच रोझॅमंडचं चित्त विचलित झालं. अपघातांत सापडलेल्या त्या दुर्दैवी वैमानिकाबद्दल जी अनुकंपा तिच्या ठिकाणीं उत्पन्न झाली तिचं स्वरूप निर्भेळ नव्हतं; प्रीतीचा तो प्रारंभ होता.

त्या जखमी वैमानिकाचं नाव 'क्लाइव्ह स्ट्रेंज.' तोहि एक पोरका मुलगा होता. त्याला सगेसोयरे कोणी नव्हते, व कुठल्याहि स्त्रीचं प्रियाराधन त्यानं केलेलं नव्हतं. म्हणजे आपापल्या भिन्न मार्गानं जाणारे दोन एकाकी जीव अपघाताच्या निमित्तानं एकत्र आले. रोझॅमंडनं क्लाइव्हची जरी शुश्रूषा केली तरी ती त्याच्या दृष्टीस पडली नाहीं. कारण अपघातांत सापडल्या क्षणापासून त्यानं बेशुद्धीमुळें

डोळे मिटून घेतले होते, व पुढें डॉक्टरांनीं त्याच्या दुखावलेल्या खांद्याप्रमाणेंच डोळ्यांवरहि पट्ट्या बांधून टाकल्या.

क्लाइव्हला हॉस्पिटलमध्यें नेऊन ठेवणं आवश्यक होतं. रोझॅमंडनं आपल्या खर्चानं त्याची अगदीं उत्तमांतली उत्तम व्यवस्था करविली. हॉस्पिटलमधील डॉक्टरांना असा संशय आला कीं, अपघातांत क्लाइव्हच्या फक्त डोक्यालाच मार बसला नसून त्याच्या दोन्ही डोळयांना जबरदस्त इजा पोंचली असली पाहिजे. या शंकेचं निरसन करून टाकण्यासाठीं त्यांनीं ऑपरेशन केलं तेव्हां त्यांना आढळून आलं कीं, त्यांचा तर्क खरा होता. क्लाइव्हच्या दोन्ही डोळ्यांचीं बुबुळं दुखावलीं होतीं. त्यावर कसलाहि इलाज चालण्यासारखा नव्हता. तो कायमचा आंधळा झाला होता.

त्याला याप्रमाणें जन्माचं अंधत्व आलं म्हणून रोझॅमंडचं त्याच्यावरचं प्रेम बिलकूल कमी झालं नाहीं. उलट तिच्या मनांत उद्भवूं लागलेली एक भीति दूर झाली; तिचं क्लाइव्हवर मन जडलं तसं त्याचंहि आपल्यावर जडल्याचं तिला आढळून आलं होतं. परंतु तें आढळून येतांच तिला भय वाटूं लागलं होतं कीं, क्लाइव्हच्या डोळ्यांवरच्या पट्ट्या सुटल्या व आपण त्याच्या दृष्टीस पडलों कीं हें सारं संपेल. आपण दिसायला विद्रूप आहोंत हें त्याला कळल्यावर आपल्याविषयीं त्याला वाटणारं आकर्षण कायम राहणं शक्यच नाहीं. क्लाइव्हची दृष्टि कायमची गेली असा डॉक्टरांनीं निकाल दिल्यावर तिला त्याच्याबद्दल अतिशय अनुकंपा तर वाटलीच, परंतु आपल्या प्रीतीच्या मार्गातलं एक मोठं संकट टळलं अशा विचारानं तिला गुप्त हर्षहि वाटल्यावांचून राहिला नाहीं. हॉस्पिटलमधें एकीकडे क्लाइव्ह दुखण्यांतून बरा होत होता, आणि एकीकडे तो व रोझॅमंड एकमेकांचं अनुरंजन करीत होतीं.

अखेर पूर्ण विचारांतीं रोझॅमंडनं क्लाइव्हशीं लग्न करायचं

ठरवलं. ज्या दिवशीं क्लाइव्हची इस्पितळांतून सुटका झाली त्या दिवशीं तो रोझॅमंडशीं विवाहबद्धहि झाला, व त्या दोघांचं वैवाहिक जीवन सुरू झालं. पंचेंद्रियांपैकीं एक दृष्टि नाहींशी झाल्यामुळें उरलेल्या चार इंद्रियांच्या साहाय्यानं स्वतःचं आयुष्य केवळ सुसह्यच नव्हे तर रहस्यमय आणि आनंदमय करण्याचा मनोरंजक प्रयोग क्लाइव्हनं सुरू केला, व या त्याच्या प्रयत्नांत रोझॅमंड त्याला परोपरीची मदत करूं लागली, त्याला प्रोत्साहन देऊं लागली; प्रसंगीं त्याला दुःख झालं अगर त्याचा धीर खचूं लागला तर आपल्या चातुर्यानं, सहानुभूतीनं अन् आशावादानं ती त्याला सावरून घेऊं लागली. त्यांच्या वैवाहिक जीवनाला एका गूढ साहसाचं व चित्ताकर्षक प्रयोगाचं स्वरूप प्राप्त झालं, आणि वर्षाच्या अखेरीस रोझॅमंडला एक मुलगी झाली.

या ठिकाणीं कादंबरी संपली. कथानक किती साधं आहे व त्यांत नाट्यपूर्ण घटनांचा किती अभाव आहे तें आतां वाचकांच्या लक्षांत आलं असेल, व केवळ मनोविश्लेषणात्मक असं तिचं वर्णन केलं पाहिजे हें माझं प्रारंभीचं विधान त्यांना आतां पटलं असेल. अर्थात् रचनाचातुर्य किंवा तंत्रविषयक कौशल्य या दृष्टींनीं मला या कादंबरीचं विवेचन करतां यायचं नाहीं. कादंबरींत चित्तवेधकता निर्माण करण्यासाठीं विस्मय व जिज्ञासा हीं जीं दोन हत्यारं लेखक सामान्यपणें वापरीत असतात त्यांचा वॉरिक डीपिंग यांनीं प्रस्तुत कादंबरी लिहितांना जाणून बुजून त्याग केलेला दिसतो. विस्मयकारक वाटण्यासारखी घटना या कादंबरींत फक्त एकाच ठिकाणीं आहे. केव्हां, तर क्लाइव्हसारखा देखणा तरुण पुरुष रोझॅमंडच्या बंगल्याच्या आवारांत अपघातांत सांपडून येऊन पडतो तेव्हां. जें रोझॅमंडनं वयाच्या पस्तीसाव्या वर्षापर्यंत कटाक्षानं टाळलं—अंतीं दुःखाचं होईल या शंकेनं व

भीतीनं टाळलं—तें तिच्या अगदीं दारांत आणून टाकण्यासाठीं कादंबरीकारानं हा अपघात योजलेला आहे. एखाद्या कादंबरींत मोटारचा अपघात दाखविला कीं तिच्यांतल्या माणसांना होत नसेल येवढी दुखापत आमच्या कांहीं टीकाकारांच्या मनाला होते. परंतु आकस्मिक घडणाऱ्या गोष्टींवांचून पेचप्रसंग उत्पन्न होत नाहींत, व असल्या आकस्मिक गोष्टी लहानमोठ्या अपघातांतूनच बहुधा निर्माण होतात, या न्यायापुढें इलाज नाहीं. आपल्या लोकांच्या व्यवहारांत जेव्हां बैलांच्या व घोड्यांच्या गाड्या रूढ होत्या तेव्हां मराठी ललितकथांत त्यांचे अपघात घडत. आतां बस व मोटार सामान्य झाली तेव्हां कादंबऱ्यांत तिचे अपघात होऊं लागले. लवकरच जेव्हां विमानांचा प्रवास मामुली होऊन बसेल तेव्हां मराठी कथावाङ्मयांत तींहि कोसळूं लागतील. साहित्य व संसार अशा प्रकारें एकमेकांच्या संगतीनंच मार्ग क्रमीत असतात. तेव्हां क्लाइव्ह व रोझॅमंड या दोघांची अकल्पित भेट घडवून आणण्यासाठीं वॉरिक डीपिंग यांनीं जो अपघाताचा प्रसंग निवडला आहे त्याला मी दूषण देणार नाहीं. तो संभाव्य आहे एवढंच त्याचं समर्थन मी पुरेसं समजतों हें तर एक झालंच; परंतु त्या प्रसंगाची प्रशंसा आणखीहि एका निराळ्या दृष्टीनं करावी लागेल. ती दृष्टि अशी.

रोझॅमंडची एखाद्या तरुण पुरुषाशीं कादंबरीच्या हेतूसाठीं गाठ पडावयाची ती अशाच रीतीनं पडायला हवी होती कीं तिच्यांतून रोझॅमंडला सहसा निसटतां येऊं नये. सामान्य व्यवहारांतल्या एकाद्या प्रसंगीं क्लाइव्ह तिला भेटला असता तर तिनं वर्षानुवर्षं जाणून बुजून मनाशीं केलेल्या एकटेपणाच्या निश्चयावर त्याचा आघात होऊं शकला नसता. ती क्लाइव्हशीं शिष्टाचार म्हणून थोडी फार बोलली असती, व कासवानं आपले पाय पोटांत ओढून

घ्यावे त्याप्रमाणें तिनं आपल्या वृत्ती लगेच आवरल्या असत्या. म्हणून कादंबरीकारानं क्लाइव्हला रोझॅमंडजवळ आणून सोडलं तें मुळीं अशा अवस्थेंत कीं आपल्या वृत्ती आवरणं तिला अशक्य होऊन बसावं, आणि तिच्या साऱ्या जुन्या संरक्षक वृत्ती हादराव्या त्या कायमच्या.

क्लाइव्हला तिनं प्रथम पाहिलं तें त्याचं विमान कोसळून पडलं त्या क्षणीं. विमान हाकण्याच्या खड्डयांत तो गच्च सापडला होता, त्याची शुद्ध नाहींशी झालेली होती, हात वाकडे तिकडे लोंबकळत होते आणि सारं तोंड रक्तानं माखलेलं होतं. तें दृश्य पाहतांच तिला भयंकर भीति व तिच्याबरोबर त्या तरुणाविषयीं विलक्षण अनुकंपा वाटली असली तर त्यांत नवल काय? त्याला इस्पितळांत लगेच पोंचविणं अशक्य असल्यामुळें त्याला आपल्या बंगल्यांत ठेवून घेणं तिला भाग पडलं, व त्याची शुश्रूषाहि तिलाच करावी लागली असं दाखविण्यांतहि लेखकानं चातुर्य योजलं आहे. कारण यामुळेंच त्याच्याविषयीं तिला वाटणारी अनुकंपा अधिकाधिक दृढ होत गेली व अंतःकरणांतील ज्या कोणत्या तरी गूढ स्थानांतून प्रीतीचा उद्भव होतो तें त्या अनुकंपेनं अखेर जागृत झालं.

क्लाइव्हला बंगल्यांत आणून, डॉक्टरना टेलिफोन करून ती त्याच्याजवळ बसली तेव्हां तिच्या मनांतल्या विचारांचं लेखकानं कसं वर्णन केलं आहे पाहा:—

"आतां ती खोलींत एकटीच होती. तिच्याजवळच त्या तरुणाचा देह पडलेला होता. हा कोण असेल? काय उद्योग करीत असेल? त्याच्यावर प्राणापलीकडे प्रेम करणारी एखादी स्त्री असेल व तो जगतो कीं मरतो यावर तिचं सारं भवितव्य अवलंबून असेल! त्या देहाकडे तिला पाहवेना. पण मन घट्ट करून तिनं पाहिलं. मात्र

चेहऱ्याकडे नव्हे तर कोटाच्या बटनांकडे. त्याचा श्वासोच्छ्वास होत होता काय? कांहीं हालचाल? तिला उगीचच वाटलं कीं त्याचा ऊर वरखालीं हालला. आणि मग एकदम तिची दृष्टि त्याच्या हातावर खिळली. त्याकडे टक लावून पाहावंसं तिला वाटलं. तो साधा हात नव्हता; त्यांत कांहीं तरी विशेष होतं. त्याचीं बोटं लांबसडक, पातळ आणि नाजुक होतीं. आणि त्याप्रमाणेंच त्याच्या एकंदर शरिराच्या कातडीचा वर्णहि सुकुमार दिसत होता......"

मग रात्रीं डॉक्टरांच्या सांगण्याप्रमाणें त्याची शुश्रूषा करतांना तिच्या मनाची हचि प्रतिक्रिया चालू राहिली. "त्याच्या बिछान्याजवळ उभं राहून खालीं वांकून ती लक्षपूर्वक पाहूं लागली. त्याची श्वसनक्रिया चालू होती काय? त्याच्या अंगावरचं पांघरूण थोडंसं वर खालीं झाल्यासारखं तिला वाटलं. उशीवर त्याचा हात पडला होता तो उघडाच होता. तिनं झट्‌कन आपलीं बोटं त्याच्या मनगटावर फिरविलीं. त्या स्पर्शाबरोबर तिच्या अंतःकरणाचा जो हट्टी भाग होता तो एकदम थरारला......"

आणि मध्यरात्र उलटल्यावर तो एकदम शुद्धीवर आला, व त्यानं विव्हल स्वर काढला तेव्हां ती एकदम त्याच्याजवळ गेली. डॉक्टरांनीं बांधलेलीं बँडेजं तो ओढीत असल्याचं दिसतांच तिनं त्याचा हात हलकेच पकडला. त्याच्या विमानाला अपघात कसा झाला, त्याला आपण आपल्या घरांत कसं ठेवलं आहे, डॉक्टरनीं त्याच्या जखमा कशा बांधल्या आहेत इत्यादि गोष्टी तिनं त्याला समजावून सांगितल्या. हें सारं ऐकतांना "त्यानं तिचा हात आपल्या हातीं अगदीं घट्ट धरून ठेवला होता—एखाद्या भेदरलेल्या लहान बालकाप्रमाणं!...तिनंहि उलट आपला हात त्याच्या हातीं ठेवला होता."

"आतां किती वाजले असतील?" त्यानं विचारलं.

" सुमारें एक वाजला आहे."

" एक ! आणि तुम्ही अशा जागत बसलां आहांत ? नको नको. जा तुम्ही. मी ठीक आहे."

" पण तुम्ही बिलकुल बोलतां कामा नये. मी आत्तां डॉक्टरना बोलावणं पाठवलं आहे आणि त्यांच्या गाडीसाठीं मला फाटक उघडायला पाहिजे. बाहेर रात्रीची शोभा कशी पसरली आहे ! आभाळांत चंद्र दिसतो आहे."

आणि मग तो एकदम म्हणाला, " तुम्हांला पाहावंसं मला वाटतं."

त्याबरोबर स्वतःच्या विद्रूपतेची रोझॅमंडला एकदम आठवण झाली. ती चपापली. तिनं आपला हात हलकेच काढून घेतला.

" ती बंगल्याच्या बाहेर पडली. जिकडे तिकडे चांदणं पसरलं होतं. परंतु रोझॅमंड मनांतल्या मनांत रुष्ट झाली होती; व स्वतःची निर्भर्त्सना करावीसं तिला वाटूं लागलं होतं. तिचं स्वरूप त्याच्या दृष्टीस लवकरच पडणार होतं. तारुण्यांतील एक अत्यंत मधुर भावना एखाद्या पाखरांप्रमाणें क्षणभरासाठीं तिच्या आयुष्यांत प्रविष्ट झाली होती; परंतु ती जशी आली तशीच वेगानं उठून जाणार होती ! त्याचे प्राण वांचले व त्यानं डोळे उघडले कीं परिस्थिति एकदम पालटणार होती, व त्या परिस्थितीच्या आरशांत तिला निराशेखेरीज दुसरं कांहीं दिसत नव्हतं. परंतु तिचं अंतःकरण एकदम इतकं हळुवार कशानं झालं होतं ? जी भावनावशता तिनं आजपर्यंत दूर ठेवली तिच्या मिठींत ती सापडत होती काय ? वेडी ! "

मूळ कादंबरींतले जागजागचे उतारे हे मीं इतक्याच हेतूनं दिले आहेत कीं, क्लाइव्हविषयीं रोझॅमंडच्या मनांत उत्पन्न झालेल्या अनुकंपेतून ज्या विकार-विचारांच्या सूक्ष्म छटा हलके हलके बाहेर

पडूं लागल्या त्या वॉरिक डीपिंग यांनीं किती हलुवार हातानं रंगविल्या आहेत त्याची वाचकांना कल्पना यावी. क्लाइव्हवर आपण अनुरक्त झालों आहोंत हें लक्षांत येतांच त्या मृदु भावनेशीं तिनं दीर्घकाल झटापट केली. जें आजपर्यंत आपण कधीं होऊं दिलं नाहीं तें होत आहे या जाणीवेनं ती भ्याली. आपला एक प्रकारें पराजय होत आहे असं वाटून ती चिडलीं. तिला आपल्या शरीराची पूर्वी कितीदा तरी खंत वाटली होती. आपला देह म्हणजे आपला एक मोठा शत्रु आहे असं तिला वाटलं होतं. एकदां त्या उद्वेगाच्या भरांत तिनं विष खाऊन आत्महत्या करण्याचा प्रयत्न केला होता. आतां तिला क्लाइव्हचं प्रेम हवं होतं. परंतु त्यानं डोळे उघडले कीं, त्याला तिची किळस येणार होती. ज्या दिवशीं हॉस्पिटलमध्यें क्लाइव्हचे डोळे तपासण्यासाठीं त्यांवर ऑपरेशन होणार होतं, त्या दिवशीं तर तिच्या मनांतल्या युद्धानं उग्र स्वरूप धारण केलं. तिला एकदां वाटे त्याच्या समाचारासाठीं जावं. पुन्हा वाटे, नको, आपण क्लाइव्हची भेट पुन्हा घेतलीच नाहीं म्हणजे सारं आपोआप संपेल. या वेळच्या तिच्या मनांतील खळबळीचं लेखकानं जें वर्णन केलं आहे तें फार सुंदर आहे.

"भावनांच्या या वावटळी तिला अगदीं असह्य झाल्या. आजपर्यंत ती जीवितापासून दूर राहिली होती. त्याची तिनं धास्ती घेतली होती. प्रीतीचा अनुभव घेण्यांत, दुसऱ्याचं अंतःकरण जिंकण्याचा प्रयत्न करण्यांत यशाप्रमाणं अपयशाचाहि संभव असतो. असल्या साहसापासून ती दूर राहिली होती. मानवी आयुष्यांतील मोठ्या पेचप्रसंगांची ज्वाला तिनं टाळली होती. कारण तिची झळ तेवढी आपल्याला लागेल असा तिचा तर्क होता. प्रेमिकांचीं सुखदुःखं तिनं आपल्या कादंबऱ्यांतून वर्णिलीं होतीं. जीवित जगणं

कठीण आहे, त्याचं वर्णन करणं सोपं आहे. आपल्या खोलीच्या कोंडवाडयांत कादंबऱ्या लिहितांना माणसावर सुखदुःखांचा लोंढा प्रत्यक्ष पडत नसतो; पण तेंच त्यानं जीवितांत प्रत्यक्ष पाऊल टाकलं, कीं नाना प्रकारच्या भावना वाकुल्या दाखवूं लागतात......"

परंतु क्लाइव्हचा संबंध तोडून टाकणं हा भेकडपणाचाच एक प्रकार होता. जीविताशीं झगडण्याची, तसं करतां करतां ठेच लागली, जखम झाली तरी ती सहन करण्याची एक नवीनच प्रवृत्ति रोझॅमंडच्या ठिकाणीं आतां उत्पन्न झाली होती. ती क्लाइव्हच्या भेटीला गेली.

आणि त्याची दृष्टि कायमची गेली असा डॉक्टरांनीं निकाल दिल्यावर तिला एकीकडे त्याच्याविषयीं विलक्षण करुणा वाटली, परंतु एकीकडे तिला एक प्रकारचा सुरक्षितपणा वाटला. ती रोज नेमानं हॉस्पिटलमधें जाऊन त्याची भेट घेऊं लागली, व दीर्घकाल त्याच्याशीं बोलत बसूं लागली. आपल्या मनांतलं त्याच्याविषयींचं प्रेम अधिक स्पष्टपणें व्यक्त करण्याची तिची आतां तयारी होती. या मनःस्थितींत ती असतांना एका प्रसंगाचं वर्णन वॉरिक डीपिंग यांनीं कसं केलं आहे पाहा :—

"बरोबर आणलेला सुगंधी पुष्पांचा गुच्छ तिनं त्याच्या उशागतीं ठेवला, आणि ती त्याच्याकडे पाहत राहिली. त्याचे केस पांढुरके होते— अगदीं नितळ आणि नाजुक. तिनं त्याच्या ओठांकडे दृष्टि लाविली. त्या ओठांत व नाकपुड्यांच्या बाकांताहि तसाच नाजुकपणा तर होताच; पण शिवाय—त्यांचं वर्णन करण्यास योग्य असे शब्द तिला सुचेनात. मग तिनं त्याच्या उघड्या हाताकडे पाहिलं. तो अतिशय नाजुक आणि एखाद्या स्त्रीच्या हातासारखा तिला वाटला. त्याच्या बोटांची जागच्या जागीं हालचाल होत होती. तिला स्पर्श

करण्याची त्याची इच्छा असावी, परंतु तिच्याप्रमाणेंच तोहि भीत असावा.

मग तो एकदम म्हणाला, " तुमच्या येण्याकडे मी अगदीं डोळे लावून पडलों होतों."

तिनं त्याच्या ओठांच्या हालचालीकडे नजर लावलेली होती. आपण भलतंच बोललों अशा शंकेनं भिऊन एकदम मिटल्याप्रमाणें त्यानं आपले ओठ मिटले. त्याचा अर्थ तिच्या लक्षांत येतांच तिच्या स्वतःच्या अंतःकरणांत भावनेचा कढ उठला तो तिला असह्य वाटला. तिनं चट्कन त्याच्या हातावर आपला हात टेकला व 'क्लाइव्ह !' एवढाच आर्द्र उद्‌गार काढला.

आपल्या बोटांनीं तिचा हात घट्ट पकडून कांहीं न बोलतां तो स्वस्थ पडून राहिला. मग तिचा हात आणखी दाबीत त्यानं विचारलं,

" तुमची हरकत नाहीं ना ? "

" माझी हरकत काय म्हणून असेल ! "

तिनं उलट त्याचा हात दाबला, आणि त्या क्षणीं तिला वाटलं कीं तिच्या देहांत खोल कुठें तरी वर्षानुवर्षं लपवून दडवून ठेवलेली अशी कांहीं तरी गोष्ट एकदम जाणीवेच्या पृष्ठ-भागावर येऊन प्रकट होत आहे.

" भीति वाटते होय ? " तिनं विचारलं.

" होय, माझा भविष्यकाल मला भयानक वाटतो. माझी दृष्टि गेली. आतां साऱ्या गोष्टी मला पहिल्यापासून शिकल्या पाहिजेत. पण त्याचंहि मोठंसं नाहीं. माझ्या वांट्याला जो भयंकर एकाकीपणा येणार त्याचं फार भय वाटतं. एखाद्या गडद अंधाऱ्या खोलींतल्या कोपऱ्यांत पडलेल्या असहाय अर्भकाप्रमाणें मला यापुढचं सारं आयुष्य—"

ती खालीं वाकली आणि त्याच्या कपाळावरच्या पट्टयांवर तिनं आपले ओठ टेकले. "मला सारं कळतं" येवढंच ती पुटपुटली.

तो क्षणभर एकदम इतका स्तब्ध पडला कीं, जणूं त्याच्या अंधःकारमय सृष्टींत तिच्या ओठांच्या त्या स्पर्शानं कसल्या तरी गूढ अभिप्रायाचा प्रकाश आणला होता. त्यानं हलकेच विचारलं,

"तूं खरंच माझं चुंबन घेतलंस काय?"

"होय. क्लाइव्ह, मी चुकलें—"

"चुकलें? होय खरंच, मी अगदीं केविलवाणा दिसत असेन नव्हे?"

"मुळींच नाहीं. उलट फार सुंदर दिसतोस. मी तुझी अवस्था थोडीशी सुसह्य करूं शकलें तर मला किती अभिमान वाटेल!"

"केवढं भाग्य माझं!"

तिच्या लक्षांत येण्यापूर्वीच आपल्या हातीं धरलेला तिचा हात त्यानं आपल्या तोंडाजवळ नेला अन् तिच्या बोटांचं चुंबन घेतलं...

त्या दिवशीं रोझॅमंड क्लाइव्हचा निरोप घेऊन हॉस्पिटलमधून बाहेर पडली तेव्हां तिच्या चर्येवर कांहीं विलक्षणच भाव प्रकट झाला होता. जणूं एखाद्या दुर्मिळ, सुगंधी द्रवपदार्थानं भरलेलं कांचेचं भांडं तिच्या हातीं होतं, अन् त्यांतील एक बुंदसुद्धां खालीं पडूं द्यावयास ती तयार नव्हती."

रोझॅमंडच्या भावनांतील विविध छटा वॉरिक् डीपिंग यांनीं जितक्या कौशल्यानं चित्रित केल्या आहेत तितक्याच सफाईनं त्यांनीं निरनिराळया प्रसंगांतील क्लाइव्हचं मनोगतहि व्यक्त केलं आहे. उदाहरणार्थ—

"रोझॅमंडचं चुंबन अनुभविल्याबरोबर आपल्या अंतःकरणांत एकदम केवढी क्रांति झाली हें पूर्णपणें लक्षांत येतांच, कृतज्ञतेनं क्लाइव्ह अगदीं गोंधळून गेला. त्यानं अंथरुणाजवळ गुडघे टेकले

आणि उशींत तोंड लपविलं. दैवानं त्याच्या वांटयाला आणलेल्या निबिड अंधःकारांत एकदम जिकडे तिकडे सौंदर्य भरलेलं त्याला दिसूं लागलं. तिनं खरोखरीच त्याचं चुंबन घेतलं होतं काय? ती! तिच्याइतका मधुर आवाज जगांत दुसरीकडे कुठें असेल काय?... चुंबन घेतल्याबरोबर ती किंचित् भ्याली असावी असं त्याला वाटलं होतं. ती कां बरं भ्याली? भलत्याच भावनांच्या आहारीं आपण जात आहोंत असं वाटून? कीं असल्या आकर्षणांतून विषयाचा कर्दम उत्पन्न होतो असं ऐकलं असल्यामुळें? छे! छे! तसं नव्हे. केवळ स्त्रीसुलभ लज्जेनं तिनं तसं केलं असावं याबद्दल त्याला खात्री वाटली. जणूं अंधत्वामुळें त्याला दुसरी दृष्टि प्राप्त झाली होती व तिच्या सामर्थ्यानं रोझॅमंडचं अंतःकरण त्याला अधिकच स्पष्ट दिसत होतं. त्याच्या दृष्टीनं ती म्हणजे एक स्वर्गीय आवाज होता, सुगंध होता, अंधारांत थरथरणारा प्रकाश होता! आतां आपल्या हृदयाची अवस्था तिला सांगण्यासाठीं तो अधीर झाला. त्याला वाटलं एकदम तिला भेटावं अन् म्हणावं, तुझा आवाज ज्या क्षणीं प्रथम ऐकला त्याच क्षणींच माझं तुझ्यावर प्रेम बसलं. एखाद्या भेदरलेल्या बालकाप्रमाणे माझी अवस्था होती, आणि अंधारांत तुझा तो गोड शब्द ऐकल्याबरोबर त्या स्वराचं अंजन माझ्या अंतःकरणाला मिळालं अन् भीतीनं केलेली जखम बरी झाली......"

क्लाइव्ह आपल्यावर अनुरक्त झाला आहे, व आपल्या प्रीतीचा तो स्वीकार करील अशी रोझॅमंडची पूर्ण खात्री पटल्यावर देखील त्याच्याशीं लग्न करण्याचा निश्चय रोझॅमंडनं किती विचारपूर्वक केला तें कादंबरीकर्त्यानं मार्मिकपणानं दाखविलं आहे. किंबहुना वॉरिक डीपिंग यांनीं रोझॅमंडचं जें कल्पनाचित्र तयार केलेलं आहे तें प्रेमांत सापडलेल्या एका सामान्य स्त्रीचं नाहीं, हा या

कादंबरीचा एक आल्हादकारक विशेष आहे. विचारांनीं फार प्रगल्भ, शास्त्रीय चिकित्सक दृष्टीनं सर्व गोष्टींचं— स्वतःच्या मनांतल्या भावनांचं सुद्धां— पृथक्करण करणारी, लैंगिक विषयांची आधुनिक मनमोकळ्या वृत्तीनं चर्चा करणारी, बुद्धिप्रामाण्यानं वागणारी, उच्च शिक्षण घेतलेली एक असामान्य कीर्तीची लेखिका ग्रंथकर्ता रंगवीत आहे याचा प्रत्यय वाचकाला पदोपदीं येतो. तिची सारीं संभाषणं तिच्या बुद्धिमत्तेची व बहुश्रुततेची साक्ष देतात. ती ज्या ज्या वेळीं स्वगत विचार करते त्या त्या वेळीं ती स्वतःच्या मनाची अगदीं एखाद्या निष्णात सर्जनप्रमाणें चिरफाड करीत आहे असं वाटतं. आणि क्लाइव्हवर तिचं मन प्रथमपासून जडलं हें जितकं खरं, तितकंच त्याच्या व आपल्या जीविताचं मीलन घडवून आणण्याची तिची इच्छा तिला एखाद्या शास्त्रीय प्रयोगासारखी वाटत होती हेंहि खरं, याबद्दल वाचकाची खात्री पटते. क्लाइव्हशीं लग्न करण्याचा विचार ती जेव्हां तिची एकमेव मैत्रीण डॉ. मार्गारेट हेल हिच्याजवळ बोलून दाखविते, व ती जेव्हां तिला विचारते कीं, लग्न केल्यामुळें तुझ्या लेखनाला बाध येणार नाहीं का, तेव्हां रोझॅमंड उत्तर देते,

"माझं लेखन म्हणतेस होय ? पण खरं म्हणजे मला अलीकडे त्याचा थोडा कंटाळा येऊं लागला होता. मला वाटे, मी फक्त कागदी घोडे नाचवीत आहे. आतां यापुढें मला कदाचित् लेखन करावंसं वाटणारच नाहीं, किंवा वाटलं तरी निराळ्या तऱ्हेचं करीन. मला वाटतं आत्मप्रकटीकरणाची जबर इच्छा मला झालेली आहे. मीं पुस्तकं लिहिलीं परंतु स्त्रीचं जें प्रत्यक्ष जीवित तें मला अजून माहीत नाहीं."

"परंतु क्लाइव्ह आतां कायमचा आंधळा झालेला आहे."

"म्हणून तर त्याचं पत्नीत्व स्वीकारावंसं मला अधिकच

वाटतं. मूल झाल्यावर स्त्री ज्याप्रमाणें त्याचं संगोपन करते, त्याला वाढविते, त्याचा हात धरून, त्याला वागवून, जगांत निर्भय-पणानं वावरायला त्याला शिकविते— तसं क्लाइव्हच्या बाबतींत करतां आलं तर तो प्रयोग मला करून पाहायचा आहे."

" असं! जी निर्मितीची शक्ति आजपर्यंत तुझ्या पुस्तकांतून व्यक्त झाली तिच्यावर क्लाइव्हच्या सहवासानं चांगले संस्कार होतील असं तुला वाटतं तर?"

" माझी निर्मितीची शक्ति? होय, तसंच का म्हणेनास. त्या शक्तींतून आजपर्यंत जें निर्माण झालं त्या योगानं मी हजारों लोकांना आनंद दिला, स्वतःहि घेतला. परंतु मार्गारेट, माणसाची निर्मितिक्षमता काय फक्त ललितलेखनांतच व्यक्त होऊं शकते? तिच्या आविष्काराचे दुसरे प्रकार नाहींत? मी भावनावश होऊन खुळ्यासारखं कांहीं तरी बोलते असं समजूं नकोस. अशा पुष्कळ गोष्टी आहेत, कीं ज्या आजपर्यंत मला आंतून हव्याशा वाटत होत्या परंतु मिळाल्या नाहींत. आणि अशाहि पुष्कळ गोष्टी आहेत, कीं ज्या कुणाला तरी द्याव्या अशी विलक्षण इच्छा झाली असतांनाही मला देतां आल्या नाहींत."

हा एक उतारा मीं या ठिकाणीं नमुन्यादाखल दिला. येवढया-वरून रोझॅमंड कोणत्या प्रकारची स्त्री होती हें वाचकांच्या लक्षांत येईल. अर्थात् आपल्या विद्रूप चेहऱ्याबद्दल क्लाइव्हला अज्ञानांत ठेवून ती कांहीं करील हें शक्य नव्हतं. आपलं खरं स्वरूप कसं आहे तें क्लाइव्हला स्पष्टपणें सांगण्याच्या संधीची ती वाटच पाहत होती. हिंडण्याफिरण्याइतका तो बरा झाल्यावर ती पुष्कळदां त्याला घेऊन समुद्रतीरावर फिरायला जाऊं लागली. एकदां तीं दोघं एकान्तस्थलीं बसलीं असतांना तो म्हणाला, " तुझ्या सहवासांत मला विशेष आनंद होतो, कारण ज्या गोष्टी मी परक्या

माणसाजवळ कधीं बोलणार नाहीं त्या गोष्टी— माझ्या मनांतल्या शंका, आशा-निराशा, भीति—तुझ्याजवळ मी सहज बोलूं शकतों."

"म्हणजे तुला मी परकी वाटत नाहीं तर?"

त्यानं आपलं दृष्टिशून्य तोंड वर तिच्याकडे केलं अन् म्हटलं,

"तूं? परकी? छे! छे! तूं माझ्या अगदीं पुरती ओळखीची आहेस. सूर्यप्रकाश किंवा समुद्राचं अथांग पाणी जितकं माझ्या परिचयाचं आहे तितकीच तूंहि आहेस. तुझं चित्र माझ्या डोळ्यांपुढें अगदीं स्पष्ट स्पष्ट आहे. तुझं वर्णन करूं मी? ऐक! तुझे केस अगदीं काळेभोर आहेत. वर्ण अगदीं गोरा गोरा आहे. तुझे डोळे मोठमोठे आणि पिंगट रंगाचे आहेत. तूं मला दिसतेस ती अशी. आणि आतां पूर्ण बरा होऊन मी इथून जाईपर्यंत तूं मला अशीच दिसशील."

हें त्याचं वर्णन ऐकतांच रोझॅमंड अगदीं स्तंभित होऊन गप्प बसली. केवढा गोड पण किती दारुण आभास क्लाइव्हनं निर्माण केला होता! तो तिनं नष्ट करावा काय? प्रामाणिकपणानं तिनं सारं सांगून टाकावं काय? का तिनं त्याच्याशीं लबाडी करावी? लबाडी! तो शब्द मनांत येतांच तिचं अंग शहारलं. छे! छे! एखाद्या आरशाप्रमाणें स्वच्छ स्वरूपांत त्याच्यापुढें उभं राहण्याची तिची इच्छा होती. केवळ प्रियकर म्हणून तो तिला नको होता. त्याच्याशीं असा एक उदात्त स्नेह तिला राखावयाचा होता, इतकी निर्मल एकरूपता तिला हवी होती, कीं कोणत्याहि क्षुल्लक संवेदनेची लाट एका अंतःकरणांत उठली कीं दुसऱ्यांत उठावी.

"क्लाइव्ह!" असा उद्गार तिनं हलकेच काढला तेव्हां क्लाइव्हला वाटलं तिच्या शब्दांत आजपर्यंत कधीं न ऐकलेला ध्वनि होता. तीरावरच्या दगडांचा समुद्राच्या पाण्याला जसा आघात होत होता

तसा तिच्या त्या एकाच शब्दानं तोंपर्यंतच्या स्तब्धतेवर आघात झाल्यासारखं त्याला वाटलं.

रोझॅमंड लगेच म्हणाली, "हें बघ, मी काय सांगतें तें नीट ऐक. मी तशी मुळींच नाहीं."

"तशी म्हणजे?"

"तुझ्या कल्पनेनं निर्माण केलेल्या चित्रपट-तारकेसारखी. मी दिसायला विद्रूप आहे हें तुला आजपर्यंत कुणीच सांगितलं नाहीं काय?"

"नाहीं."

"मग आतां मी सांगतें तर. माझ्या या विद्रूपतेची मला नेहमीं शरम वाटत आली आहे. जन्मतःच माझ्या चेहऱ्याची एक सबंध बाजू डागळलेली आहे. माझ्या गालावर—"

"कोणता गाल?"

"तुझ्या बाजूला आहे तोच."

त्यानं हात उचलला, व एखाद्या लहान बालकाप्रमाणें तो आपल्या बोटांनीं तिच्या गालाला स्पर्श करून पाहूं लागला. तो म्हणाला,

"मला तर इथें कांहींच लागत नाहीं."

"हाताला लागण्यासारखं नाहीं. रंग फार वाईट आहे."

"नक्की कुठें?"

तिनं त्याचा हात धरला व त्या जागीं नेला आणि त्याच क्षणीं त्यानं जें केलं त्यामुळें विस्मयानं व हर्षानं तिचं अंतःकरण एकदम दाटून आलं. तो अगदीं जवळ आला आणि तिच्या त्या गालावर त्यानं आपले ओठ टेकले.

"शीः! इथें तर कांहींच नाहीं."

"पण हें काय हें?"

"तूं भ्यालीस ?"

"फार."

"पण रोझॅमंड, तुला हें कसं समजेना कीं माझ्या दृष्टीनं तुझं हें वैगुण्य अस्तित्वांतच नाहीं. मधुर आवाज, चैतन्यमय स्पर्श म्हणजे तूं. मला नीट सांगतां येत नाहीं. माझ्या पार्थिव चक्षूंना तूं दिसत नाहींस; परंतु तुझं जें सौंदर्य जगाला दिसत नाहीं तें मला माझ्या अंधत्वामुळें प्राप्त झालेल्या दिव्यचक्षूंना दिसतं. आणि तुझं जें रूप मला दिसतं तें विलक्षण सुंदर आहे. काय, ऐकलंस का ?"

तिनं त्याचा हात ओढून घेतला आणि तो आपल्या दोन्ही हातांत घट्ट धरला.

आणि तो हात मग तिनं कधींच सोडला नाहीं !

रोझॅमंड व क्लाइव्ह यांच्या प्रणयाची व वैवाहिक जीवनाची रम्य कथा सांगणारी ही कादंबरी मनोविश्लेषणाच्या कौशल्याचा एक अपूर्व नमुना म्हणून माझ्या सदैव लक्षांत राहील. आणि आतां वाचकांच्याहि राहील अशी मला आशा आहे.

---

## ४ : : हेस्टर व तिचं कुटुंब

" कादंबरी " या मराठी शब्दापेक्षां 'Novel हा इंग्रजी शब्द अधिक अन्वर्थक व सूचक आहे असं माझ्या मनांत पुष्कळदां येतं. 'Novel' या इंग्रजी शब्दांत नाविन्याचा जो अभिप्राय आहे तो 'कादंबरी' या शब्दांत नाहीं. तो व्यक्त करणारा दुसरा एखादा मराठी शब्द बनवून 'कादंबरी' शब्दाच्याऐवजीं रूढ करावा असं मला पुष्कळदां वाटतं. कारण नाविन्यावांचून कादंबरी बनूं शकत नाहीं असं विधान खरोखरच करतां येण्यासारखं आहे. कादंबरींत कोठें तरी नाविन्य– म्हणजे असामान्यत्व असलं पाहिजे. हें असामान्यत्व दोन प्रकारें उत्पन्न करतां येईल. कथेचा विषय जुना व सामान्य असेल परंतु त्याची मांडणी ( Presentation ) असामान्य असेल; किंवा कथेसाठीं विषय निवडतांनाच तो नेहमींहून निराळा, असामान्य अशा स्वरूपाचा निवडतां येईल. परंतु, कुठें ना कुठें तरी असामान्यत्वाचा– नाविन्याचा– अनुभव ज्या कृतींत वाचकाला मिळतो तिलाच कादंबरी म्हणतां येईल.

देखण्या स्वरूपवान् स्त्री-पुरुषांच्या कथा वाचून वाचून वाचकाच्या त्याबद्दलच्या गोडीची तीव्रता कमी होत जाते, व तो म्हणूं

लागतो, "सौंदर्यविहीन स्त्री-पुरुषांची गोष्ट मला वाचायला मिळेल काय?" आणि तसली गोष्ट त्याच्या हातीं आली कीं, विषयाच्या असामान्यत्वामुळें ती त्याला एकदम प्रिय होते. असाच थोडासा प्रकार आणखी एका बाबतींत होतो. जी कादंबरी वाचावी त्यांतील नायिका आपली देखणी असं झाल्यामुळें वाचक ज्याप्रमाणें निराळं कांहीं तरी मागूं लागतात, त्याप्रमाणेंच श्रीमंत अथवा मध्यम वर्गांतील स्त्री-पुरुषांच्या हकीकती वाचून वाचून वाचकाची कुतूहलबुद्धि थकल्यासारखी होते, व तो तक्रार करूं लागतो, "अरे, गरीबांच्या सुखदुःखांची रम्यकथा कुणी मला सांगणारच नाहीं काय ?" आणि त्याची ही तक्रार दूर करणारी कादंबरी हातीं पडल्यावर तिच्यांतील विषयाच्या नाविन्यामुळेंच त्याचं चित्त अर्धेअधिक वेधलं जातं. समाजांतील श्रमजीवी लोकांच्या जीवनाबद्दलच्या कादंबऱ्यांची इष्टता ज्या अनेक कारणांनीं मला पटते त्यांत हें एक कारण आहे. शेतकऱ्यांचं अथवा कामकऱ्यांचं आयुष्य चित्रित करणाऱ्या कादंबरीला विषयाच्या नाविन्यामुळें उत्पन्न होणारी चित्तवेधकता आपोआपच प्राप्त होते, व लेखक खरोखरच कसबी असेल तर या गोष्टीचा फायदा तो भरपूर घेऊं शकतो.

मात्र श्रमजीवी लोकांच्या व्यवहारावर आधारलेली कादंबरी विषयाच्या नाविन्यामुळें वाचकाला प्रथमदर्शनीं आवडेल हें जरी खरं, तरी केवळ तेवढ्या एकाच गुणाच्या जोरावर कादंबरी यशस्वी होऊं शकणार नाहीं. शेतकऱ्यांच्या व कामकऱ्यांच्या जीवनाविषयींची कादंबरी कुणीहि कशीहि लिहिली तरी ती यशस्वी झालीच पाहिजे असा भलता समज कोणी करून घेऊं नये. 'यशस्वी' हा शब्द मी ललितलेखनकलेच्या व शास्त्राच्या दृष्टीनं वापरीत आहे. कारण कलेच्या कसोटीनं पाहिलं असतां ज्या भिकार ठरतील, परंतु

ज्यांचा इंग्रजी साहित्याच्या जगांत कांहीं विशिष्ट आगंतुक कारणांनीं बोलबाला झाला व तो ऐकून आम्हीहि आंधळेपणानं उदोउदो केला अशा 'यशस्वी' कादंबऱ्यांचीं उदाहरणं माझ्या डोळ्यांपुढें आहेत. पर्ल बक् या लेखिकेची 'गुड् अर्थ' ही कादंबरी त्यांपैकींच. या कादंबरीचा व लेखिकेचा जो बोलबाला आमच्या झाडून साऱ्या मराठी नियतकालिकांनीं केला तो पाहून तर मला असंहि वाटलं कीं, ज्याप्रमाणं सुंदर सुंदर पाश्चात्य ललितकथांचा परिचय मराठी वाचकांना करून देण्यासाठीं मीं 'मनोहरची आकाशवाणी' लिहिली, व प्रस्तुत 'वेचलेले मोती' लिहीत आहे त्याप्रमाणेंच ज्यांची कीर्ति म्हणजे केवळ जाहिरातबाजीनं निर्माण केलेला एक भ्रम आहे अशा कादंबऱ्यांचं सत्यस्वरूप वाचकांपुढें ठेवण्यासाठीं एक लेखमाला लिहावी. Nobel Prize मिळविणारा लेखक नट् हॅम्सेन, तेंच पारितोषिक मिळविणारा लुई पिरँडेलो आणि त्याप्रमाणेंच लेखिका पर्ल बक् यांचा समाचार खरोखर घेण्यासारखा आहे. 'नकली मोती' किंवा 'खराब मोती' अशा एखाद्या नांवानं एक लेखमाला मी पुढेंमागें लिहीनहि. पण तें असो. प्रस्तुत मुद्दा असा कीं एखादी कादंबरी केवळ ती श्रमजीवी लोकांबद्दल आहे येवढ्या एकाच कारणानं प्रशंसेस पात्र समजतां येत नाहीं. तिच्या ठिकाणीं ललितलेखनाचे गुण किती आहेत हाच विचार चिकित्सक रसिकानं मुख्यतः केला पाहिजे. 'कलेसाठीं कला' या माझ्या आग्रहांत हेंच तत्त्व अभिप्रेत आहे. असं असल्यामुळें शेतकरी, कामकरी, कोळशाच्या खाणींत काम करणारे मजूर, कोळी इत्यादि वर्गाच्या जीवितक्रमाविषयींच्या बऱ्याच कादंबऱ्या जरी मीं वाचल्या तरी त्यांतल्या दोन-तीनच मला विशेष आवडल्या. त्यांपैकीं एक तर मला फारच हृद्य वाटली, व श्रमजीवी लोकांच्या

जीवनाबद्दलची चांगली ललितकथा कशी असावी या प्रश्नाचं उत्तर म्हणून मी या कादंबरीकडे खचित बोट दाखवीन.

या कादंबरीचं नांव "Hester and Her Family" (प्रकाशक: Chatto & Windus) हिच्या कर्त्याचं नांव H. W. Freeman या लेखकाला शेतकरी, कामकरी लोकांचं जीवित वर्णन करून सांगण्याची विशेष आवड आहे. तथापि "जोसेफ् अँड हिज ब्रेद्रेन", "डाउन इन् दि व्हॅली", "फादर्स ऑफ देअर पीपल" या त्याच्या कादंबऱ्यांपेक्षां प्रस्तुत कादंबरी मला अनेक पटींनीं अधिक आवडली. कां तेच आतां मी वाचकांना सांगणार आहे.

तसं पाहिलं तर या कादंबरींत किती तरी मोठाले दोष आहेत. पहिला दोष म्हणजे तिचा अवाढव्य विस्तार. या विस्तारामुळें हिचं कथानक थोडक्यांत सांगणं देखील मला कठीण जाणार आहे. 'पर्ल बक्'च्या 'गुड अर्थ' कादंबरींत ज्याप्रमाणें कथानक नातवापणतवापर्यंत गेलेलं आहे तशीच थोडीशी या कादंबरीची स्थिति आहे. 'गुड अर्थ' हें एक रूक्ष रामायण आहे, तर फ्रीमनची ही कादंबरी आकर्षक कथा आहे हें निःसंशय. तथापि कादंबरीचा एकंदर पसारा प्रमाणाबाहेर वाटतो. १८५५ सालापासून १९३० पर्यंतचा, म्हणजे पंच्याहत्तर वर्षांचा एका कुटुंबाचा इतिहास या कादंबरींत वर्णिलेला आहे. 'हेस्टर' ही या कादंबरीची नायिका. परंतु कादंबरीला प्रारंभ होतो तो तिच्या बापाच्या बापापासून, आणि कादंबरी समाप्त कुठें होते, तर हेस्टरची पहिली मुलगी 'जेनी' हिच्या भरतारुण्यांतील एका प्रसंगाच्या वर्णनांत. म्हणजे तीन पिढ्यांची कहाणी लेखकानं सांगितलेली आहे. यामुळें एकंदर कादंबरींत बंदिस्तपणा कमी वाटतो.

शिवाय मनोवेधक प्रसंग व घटना निर्माण करून त्यांची गुंफण करण्याचा प्रयत्न लेखकानं मुळींच केलेला नाहीं. कादंबरीला कथानक आहे यांत संशय नाहीं, परंतु त्यांत पिळदारपणा अथवा कौशल्यानं निर्माण केलेला पेचदारपणा नाहीं. ज्यांचीं सुखदुःखं या कादंबरींत वर्णिलीं आहेत तीं जशीं साधींसुधीं, ओबडधोबड माणसं त्याप्रमाणेंच त्यांच्या जीवितावरचं हें कथानकहि साधंसुधं, सरळ, निसर्गतः फोफावत जाणाऱ्या व विस्तार पावणाऱ्या एखाद्या वटवृक्षासारखं आहे. या कथानकावर कल्पकतेचा विशेष संस्कार लेखकानं फार थोडा केलेला आढळेल, व अशी कल्पकता दृष्टीस पडतांच आपल्याला नेहमीं जो आनंद होतो तो या पुस्तकांत मिळणार नाहीं.

इंग्लंड देशाच्या पूर्व किनाऱ्याला अगदीं मध्यावर 'सफोक' नांवाचा परगणा आहे. या मुलखांत 'आरबूर्न' आडनांवाचं एक कुटुंब होतं. हें घराणं मूळचं शेतकऱ्यांचं. परंतु शेतीसारख्या निवान्त उद्योगांत त्यांचं साहसप्रिय मन रमेना. त्यांनीं शेतकऱ्याचा पेशा सोडला, व निराळाच धंदा ते करूं लागले. 'सफोक' परगण्यांत मेंढ्या, घोडीं, बैल, डुकरं असल्या गुरांचे मोठमोठे बाजार भरत, व दूरदूरचे शेतकरी, अथवा श्रीमंत लोक या बाजारांत येऊन जनावरांची खरेदी करीत. विकत घेतलेलीं जनावरं बाजारांतून आपापल्या घरीं न्यायचीं झालीं तर त्या काळांत रेल्वेची चांगली सोय कुठें होती ! तेव्हां एखाद्या गुराख्याच्या ताब्यांत तीं द्यावीं, व तीं रस्त्यारस्त्यानं हाकून आणून घरपोंच करण्याबद्दल त्याला थोडं भाडं द्यावं हाच मार्ग सारे लोक पसंत करीत. अशा गुराख्यांचा एक स्वतंत्र पेशाच त्या वेळेस इंग्लंड देशांत होता. हा पेशा फार कष्टाचा व संकटाचा असे. निरनिराळ्या दहा मालकांचीं पांच-पन्नास गुरं— गाई, बैल, वासरं, शिंगरं, घोडे अशांचा कळप शेंकडों मैल हाकून

न्यायचा व ज्यांचीं त्यांचीं जनावरं सुखरूप पोंहोचतीं करायचीं म्हणजे मोठं बिकट काम असे. अर्थात् या कामाला अनुरूप असा या गुराख्यांचा स्वभाव बनत असे. दिवसभर रस्ता पायांखालीं तुडवावा, नाठाळ गुरं ताब्यांत ठेवावीं, तहान म्हणूं नये, भूक म्हणूं नये, रात्रीं कुठें तरी अंग टाकावं, पैसे हातीं आले कीं, निशापाणी करण्यांत अथवा इतर व्यसनं करण्यांत ते उधळून टाकावे, मस्तवाल गुरांशीं वागून वागून अंगीं आलेली मस्ती माणसाशीं मारामारी करण्यांत जिरवावी, अशा प्रकारचं या भटक्या गुराख्यांचं चरित्र असे. मूळचे शेतकरी असलेले 'आरब्र्नं' लोक असल्या नमुन्याचे भटके गुराखी केव्हां बनले तें निश्चित सांगतां येण्यासारखं नव्हतं.

'ॲमॉस' आरब्र्नं हा असलाच एक धटिंगण गुराखी होता. त्याला सारे लोक " चाळिश्या ॲमॉस " अशा टोपण नांवानं ओळखीत असत. कारण तो चाळीस वेळां दारू पिऊन दंगाधोपा करून तुरुंगांत गेला होता. याचा मुलगा 'नेड' हा तर बापसे बेटा सवाई निघाला. तो असा अट्टल दारूबाज कीं चाळिश्या ॲमॉस नेहमीं म्हणे, " मी माझ्या वयाच्या पन्नास वर्षांत जेवढी दारू प्यालों तेवढी एकत्र केली तर ती ओढायला चाळीस घोडे पुरायचे नाहींत. पण माझा मुलगा नेड चाळिशीच्या आंतच तेवढी दारू खलास करणारसं दिसतं. शाबास पठ्ठे." नेडच्या रक्तांत साहसाची जी आवड होती तिचं 'सफोक' व 'नारफोक' या दोन परगण्यांत येरझाऱ्या घालण्यापासून समाधान होईना. इंग्लंडच्या पश्चिम किनाऱ्याकडचा वेल्सचा जो डोंगराळ मुलूख आहे त्याचं त्याला विलक्षण आकर्षण वाटे. वेल्सचे घोडे त्या काळीं फार प्रसिद्ध होते. तसलीं उमदीं घोडीं आपल्या मालकीचीं असावींत अशी जबरदस्त महत्त्वाकांक्षा त्याच्या मनांत

उत्पन्न झाली. आणि एकदां सफोकच्या बाजारांत वेल्समधल्या एका श्रीमंत शेतकऱ्यानं जेव्हां गुरं खरेदी केलीं तेव्हां तीं पोंचविण्याची कामगिरी पत्करून त्यानं आपली जन्मभूमि सोडली ती कायमची.

वेल्सकडे मजल दर मजल करीत जात असतां कांहीं एका प्रसंगाच्या निमित्तानं एका शेतकऱ्याची मुलगी 'लेटी' नेडवर फिदा झाली. वारुणीप्रमाणेंच वनिताहि नेडला प्यार होत्या, परंतु घटकाभर मजा मारण्याचं एक साधन यापलीकडे त्यानं स्त्रियांकडे कधींच लक्ष दिलं नव्हतं. तथापि योगायोग असा कीं नेडच्या संरक्षणाची लेटीला गरज होती. सावत्र आईच्या व बापाच्या जाचाला ती कंटाळली होती व शिवाय नेडवर ती आषकहि झाली होती. ती घरांतून पळाली व नेडबरोबर निघून गेली.

नेडनं तिच्याशीं लग्न केलं. परंतु त्याच्यासारखा भटक्या, मस्तवाल माणूस तिच्याबरोबर संसार करीत एके ठिकाणीं नांदेल हें शक्यच नव्हतं. लेटी बाळंतीण झाली तेव्हां नेडचा पत्ता नव्हता. बाळंतपणानंतर दोनच दिवसांत लेटी कालवश झाली, आणि पुढें लवकरच नेडहि बुडून मेला. लेटीची मुलगी 'हेस्टर' सर्वस्वीं अनाथ झाली.

हेस्टरचीं पहिलीं चौदा वर्षं अनाथाश्रमांत गेलीं. पण नंतर मिसेस मेवेद् नांवाच्या एका शेतकरणीनं या मुलीला आपल्या घरीं नोकरीला म्हणून नेलं. या बाईच्या घरांत हेस्टर चार वर्षं राहिली. परंतु आजाचं व आईबापांचं साहसप्रिय उसळतं रक्त तिच्यांत खेळत होतं. तिला या साध्या तैनातींत कुठलं चैन पडायला ? तिनं त्या गांवचा पाद्री हेडॉकसाहेब यांच्या घरीं मोलकरिणीची नोकरी मिळविली. शेतकऱ्याच्या घरांत मोलमजुरी करून तिला कंटाळा आला होता, आणि समाजांत ज्यांना 'बडे लोक' (जंट्री) म्हणतात त्यांचं

आयुष्य कसं असतं तें तिला पाह्यचं होतं. ही तिची फार दिवसांची मनीषा हेडॉकच्या घरांत पूर्ण होऊं लागली. आणि याच घरांत तिच्या एकंदर जीवितावर परिणाम करणारी अशी एक गोष्ट घडून आली. हेडॉकचा तरुण मुलगा 'ह्यूबर्ट' तिला एखाद्या मदनाच्या पुतळ्यासारखा वाटे. तिनं आपलं सर्वस्व त्याच्या स्वाधीन केलं, आणि त्याच्यापासून तिला गर्भ राहिला! मात्र हेस्टर स्वभावानं जशी साहसी होती, काव्यकल्पनांच्या अंकित होणारी होती, तशीच मोठी व्यवहारी होती. तिनं ह्यूबर्टला आपलं तनमनधन अर्पण केलं हें खरं, परंतु आपलं त्याच्याशीं लग्न होणं शक्य नाहीं हें ती पहिल्यापासून जाणून होती. 'जेसे रॅव्हेन्' नांवाचा कौलारं शाखारण्याचा धंदा करणारा एक मनुष्य तिच्या नादीं लागलेला होता. तिचा ह्यूबर्टशीं संबंध जडण्यापूर्वीच त्याची व तिची एकान्तीं गाठ पडली होती. ह्यूबर्टपासून गर्भ राहिल्याचं लक्षांत येतांच हेस्टरनं जेसेशीं विवाह केला. तिला लवकरच मुलगी झाली. लोकदृष्टीनं ती जेसेची होती व तिचं आडनांव 'रॅव्हेन' असंच लागणार होतं, परंतु ह्यूबर्टपासून झालेली ती आपली मुलगी म्हणून हेस्टरला ती विशेषच प्रिय होती, व तिनं तिला जें नांव ठेवलं तें ह्यूबर्टच्या आईचं—जॅनेट. जेनी रॅव्हेन अशा नांवानं ही मुलगी मोठी होऊं लागली.

हेस्टरनं जेसेशीं जरी लग्न केलं तरी त्याच्यावर तिचं प्रेम बिलकुल नव्हतं. जवानींतला एक मूर्खपणा म्हणून त्याच्याशीं आपला शरीरसंबंध तिनं प्रथम जड़ दिला होता; आणि वैषयिक दृष्टीनं पाहिलं तरी सुद्धां त्याच्यापासून तिला खरं सुखसमाधान असं कधींच झालं नव्हतं. देखण्या, ऐटबाज ह्यूबर्टशीं प्रेमसंबंध करतांना तिला ज्या उन्मादाचा अनुभव मिळे त्या मानानं जेसेचा सहवास तिला अगदीं मिळमिळीत व असंतोषकारक वाटे. जेसे आपल्याला कधींच

सुखी करूं शकणार नाहीं हें ती जाणून होती. जेसेच्या स्वभावांतच कामुकता नव्हती. लग्नानंतर तर हेस्टरकडे तो अगदींच दुर्लक्ष करूं लागला, व त्याची धार्मिक वृत्ति उत्तरोत्तर वाढूं लागली. हेस्टरच्या वांट्याला अगदीं रूक्ष आयुष्य आलं, व तिला त्या वैवाहिक-जीवनाचा कंटाळा येऊं लागला. याच सुमारास 'चार्ली फुल्चर' नांवाच्या ढोराचा धंदा करणाऱ्या एका तरुणाशीं तिचा कांहीं प्रसंगानं परिचय झाला व त्याच्यावर ती अनुरक्त झाली. तिचा व्यभिचार लक्षांत येतांच जेसे घरांतून निघून गेला. ख्रिस्तांच्या आज्ञांचा लोकांना उपदेश करीत पर्यटन करण्याचं त्यानं ठरविलं होतं. जेसे याप्रमाणें परागंदा झाल्यावर चार्ली हेस्टरच्या घरीं येऊन राहिला, व त्या दोघांचं लग्न होणं जरी अशक्य होतं तरी तीं दोघं अगदीं नवराबायकोसारखीं आनंदानं संसार करूं लागलीं. हेस्टरला आणखी दोन मुलं झालीं; एक मुलगी तिचं नांव फिलिस आणि एक मुलगा, त्याचं नांव फ्रेड. चार्ली मोठा उद्योगी होता, व त्याचं हेस्टरवर पराकाष्ठेचं प्रेम होतं. चार्लीनं हळूहळू चांगला पैसा मिळविला, घोड्यांच्या शर्यती खेळून त्यानं त्यांत भर घातली, आणि अखेर स्वतःच्या मालकीचं चांगलं दुकान थाटलं.

जेनी जसजशी मोठी होऊं लागली तसतसा तिच्या ठिकाणचा निराळेपणा व्यक्त होऊं लागला. हेस्टरची निकोप दांडगी शरीरयष्टि तर तिच्या वांट्याला आली होतीच, परंतु तिच्या सुंदर चर्येंत एक प्रकारचं संस्कृतीचं तेज दिसत असे. तिचे लहानपणचे उद्योग देखील हेस्टरच्या इतर दोन मुलांहून अगदीं भिन्न असत. अभ्यासाची तिला विलक्षण आवड होती व शाळेंतलीं सारीं बक्षिसं ती मिळवीत असे. हा निराळेपणा जेनीच्या अंगीं कुठून आला तें हेस्टरला माहीत होतं. ती आपल्या तिन्ही मुलांवर ममता करी हें खरं, परंतु जेनी तिची विशेष लाडकी होती. तिच्याकडे पाहिलं कीं

तिला वाटे—ह्यूबर्टपासून आपल्याला मिळालेला हा त्याच्या प्रेमाचा अमोल ठेवा आहे. हळूहळू हेस्टरच्या मनांत एक नवीनच महत्त्वाकांक्षा अंकुर धरूं लागली. जेनीला उच्च शिक्षण दिलं पाहिजे, जेनी बड्या समाजांत वावरणारी एक खानदानी स्त्री ( Lady ) झाली पाहिजे! त्यासाठीं तिचा आपला कायमचा वियोग झाला तरी हरकत नाहीं!

या लोकांचं वागणं किती साधं आणि निष्कपट पाहा! जेनीच्या जन्माचं रहस्य हेस्टरनं एके दिवशीं चार्लीला खुशाल सांगून टाकलं आणि ती म्हणाली, "आपण आतां श्रीमंत झालों आहोंत तेव्हां जेनीला उच्च शिक्षण दिलं पाहिजे." आणि चार्लीचं हेस्टरवरचं प्रेम इतकं अकृत्रिम अन् अमर्याद कीं तिचा व ह्यूबर्टचा संबंध होता हें कळल्यावर त्यानं विषाद मानला नाहीं. उलट तो तिला म्हणाला, "जेनी जितकी तुझी तितकीच माझीहि लाडकी आहे. तिला आपण अवश्य उच्च शिक्षणासाठीं पाठवूं."

या ठिकाणीं कादंबरीचा पहिला भाग समाप्त झालेला आहे, व दुसरा भाग सर्वस्वीं जेनीबद्दलचा आहे. किंबहुना कादंबरीला जरी 'हेस्टर आणि तिचं कुटुंब' असं नांव दिलेलं असलं तरी दुसऱ्या भागांत हेस्टर वावरते ती एक गौणपात्र म्हणून. या भागाची नायिका जेनी आहे.

जेनीच्या शिक्षणक्रमाच्या हकीगतीचा लेखकानं संक्षेप केला आहे ( आणि हा संक्षेप कथानिवेदनाचा एक गुणच मानावा लागेल. ) दुसऱ्या भागाच्या पहिल्या प्रकरणांत जेनी वाचकाला भेटते ती एका नामांकित शाळेंत मास्तरणीचं काम करीत असलेली.

ज्या शाळेंत जेनी शिक्षकिणीचं काम करीत होती तिची धार्मिक व नीतिविषयक शिस्त मोठी कडक होती. एकदां एका

तरुणाबरोबर जेनी संध्याकाळच्या वेळीं मोटारमध्यें फिरायला गेली व रात्रीं उशीरा परत आली तेव्हां तो तिचा मोठा अपराध समजण्यांत आला; तिला तापडतोब नोकरी सोडून जायला सांगण्यांत आलं; व तिनं जरी जेमतेम पंधराच दिवस काम केलं होतं तरी तिच्या हातांत सबंध टर्मचा पगार देण्यांत आला.

नोकरी सुटली म्हणून जेनीला दुःख झालं नाहीं. एवढंच कीं, हें रडगाणं सांगत हेस्टरकडे परत जाण्याची तिला इच्छा नव्हती. स्वतःच्या पायावर उभं राहण्याचा तिनं निश्चय केला. तिनं केंब्रिज युनिव्हर्सिटीची बी. ए.ची पदवी सन्मानपूर्वक मिळाविली होती. तिला दुसरी नोकरी सहज मिळण्यासारखी होती. मात्र त्या उद्योगाला लगेच लागण्याची जेनीला विशेष उत्सुकता नव्हती. बडतर्फीमुळेंच का होईना पण तिच्या हातांत तीन-साडेतीनशें रुपये आले होते. चैनीनं थोडासा प्रवास करावा असं तिच्या मनांत आलं. पदवी-परीक्षेची तयारी करतांना इटली देशाच्या चित्रकलेचा इतिहास तिनं वाचला होता, व तो अभ्यास करीत असतां एक मोठी इच्छा तिच्या मनांत बळावत गेली होती. इटलीच्या चित्रकलेचं केंद्र जें सुविख्यात फ्लॉरेन्स शहर तें एकदां पाहायचं. आतां ही संधि येतांच तिनं आपली ती इच्छा पूर्ण करायचं ठरविलं. ती फ्लॉरेन्सला गेली.

या शहरांत जेनीच्या वांट्याला चित्रविचित्र अनुभव आले. कादंबरीकारानं त्यांचं जें वर्णन केलं आहे तें मनोवेधक ठरेल; परंतु त्या वर्णनांच्या योगानं कथानकाला मोठीशी गति मिळत नाहीं. किंबहुना या भागांत एखाद्या सुरस प्रवासवर्णनाचं रूप कादंबरीला आलेलं आहे. म्हणून हीं वर्णनं सोडून देऊन या विभागाची नायिका जेनी हिची कथानकाच्या दृष्टीनं महत्त्वाची तेवढी पुढची हकीगत सांगतों.

या हकीगतीच्या एका विशेषाकडे वाचकांचं लक्ष मला वेधावंसं वाटतं. कादंबरीच्या दुसऱ्या भागांत कथानकाच्या स्थलांत एकदम मोठं अंतर पडलं आहे. पहिल्या समग्र भागाची पार्श्वभूमि वेल्सचा मुलूख आहे, तर दुसऱ्या भागांतल्या साऱ्या गोष्टी इटलींतल्या फ्लॉरेन्स शहरीं घडलेल्या आहेत. परंतु या स्थलांतरांतहि लेखकानं आपल्या विषयाचं मुख्य अवधान कायम ठेवलेलं आहे. कथानकाचा सारांश सांगता सांगतां लेखकाच्या या अवधानाचं मर्म वाचकांच्या निदर्शनाला आणल्यावांचून मला राहवत नाहीं. जेनी इंग्लंड सोडून फ्लॉरेन्सला येते, तथापि लेखक आपला विषय सुटूं देत नाहीं. श्रमजीवी सामान्य लोकांचीं सुखदुःखं आपल्याला रंगवायचीं आहेत हें तो विसरत नाहीं. जेनी एक पदवीधर सुशिक्षित तरुणी होती. फ्लॉरेन्स शहरांतल्या प्रतिष्ठित श्रीमंत लोकांतहि तिच्या ओळखी झाल्या असत्या. निदान त्या सहज घडवून आणणं कादंबरीकराला तरी खचित अशक्य नव्हतं. परंतु तसं त्यानं घडविलेलं नाहीं. आणि याबद्दल मला तरी त्याची वाहवा करावीशी वाटते.

जेनी फ्लॉरेन्सला गेली, तिथल्या कलाकृति तिनं पोटभर पाहिल्या, हळूहळू तिच्या जवळचे पैसे संपत आले; परंतु फ्लॉरेन्स शहरानं तिच्यावर विलक्षण मोहिनी टाकलेली होती. एखाद्या सामान्य प्रवाशाप्रमाणें दोन चार आठवडे त्या ठिकाणीं घालवून इंग्लंडला परत जाण्याची तिची बिलकुल तयारी नव्हती. अर्थात् कांहीं तरी उद्योग मिळविणं तिला भाग होतं, आणि या कामीं तिनं फ्लॉरेन्स शहरीं जे मित्र जोडले होते त्यांचं साहाय्य तिनं घ्यावं हें क्रमप्राप्तच होतं. परंतु तिनं कोणत्या तऱ्हेचे मित्र जोडले होते ? फ्लॉरेन्स शहरांतील कुणी नामांकित सरदार ? किंवा कुणी विद्वान् प्रोफेसर अथवा पंडित ? किंवा फॅशनेबल श्रीमंत वर्गांतले लोक ? छे !

असल्या लोकांपैकीं कुणी मित्रमैत्रिणी जेनीनं जोडल्या नव्हत्या. तिची दोस्ती फार निराळया लोकांशीं झाली होती. ती फ्लॉरेन्स शहरांत नुकतीच येऊन दाखल झाली होती तेव्हां एके दिवशीं रस्त्यांतून हिंडतां हिंडतां दमल्यामुळें ती एका 'आरामगृहां'त शिरली. वास्तविक हें आरामगृह इतक्या कनिष्ठ प्रतीचं होतं कीं, प्रतिष्ठित मुलीनं त्या ठिकाणीं जाणं म्हणजे अगदीं भलतीच गोष्ट होती. परंतु जेनी इतकी थकून गेली होती कीं, तिला असला विवेक करायला बिलकुल वेळ नव्हता. आाणि त्या आरामगृहांत शिरल्यावर तर तिला वेगळाच अनुभव आला. तिथें मदिरापान करायला जमलेले लोक झकपक पोशाखवाले नव्हते, किंवा मोठमोठ्या गहन विषयावर बोलणारे पंडितहि नव्हते. सामान्य उद्योगधंदा अगर व्यापार करणारींच माणसं होतीं तीं. परंतु जेनीनं पाहिलं तों ते सारे लोक निरुपद्रवी, साधे, प्रेमळ होते. तिचा तर त्यांनीं मोठा सत्कार केला. ती वारंवार त्या पानगृहांत जाऊं लागली व ते लोक तिचे बडे दोस्त झाले. या मंडळींत 'डिनो' नांवाचा एक तरुण पुरुष होता. पूर्वी त्यानं आपल्या दोघां भावांबरोबर खलाशाचा धंदा केला होता. पण आतां त्यानं फ्लॉरेन्स शहरांत पुस्तकाचं एक छोटसं दुकान थाटलं होतं. जेनीजवळची पुंजी संपली तेव्हां यानं तिला नोकरी मिळवून दिली. त्याचं आपल्यावर प्रेम असेल हें जेनीच्या ध्यानींमनींहि नव्हतं. परंतु प्रसंगाप्रसंगानं तिला तें लवकरच समजलं, व तीहि त्याच्यावर अनुरक्त झाल्यामुळें तिच्यापुढें मोठाच प्रश्न उभा राहिला. ती स्वतः जन्मानं इंग्रज होती. डिनो इटॅलियन होता. त्याच्याशीं विवाह करणं सर्व दृष्टींनीं सुखाचं होईल काय? तिला खात्री वाटेना. लोकापवादाला ती भीत होती असं नव्हे. किंवा डिनोच्या प्रेमाबद्दल तिला संशय वाटत होता असंहि नाहीं. त्याच्या प्रेमाबद्दल तिची इतकी खात्री होती कीं, ती आपली

खोली सोडून त्याच्या खोलींत राहायला सुद्धा गेली होती. लोकापवादाची पर्वा करणारी ती स्त्री नव्हती. निर्भयता व साहस तिच्या ठिकाणीं वंशगुणानंच आलेलं होतं, व जें प्रेम हवंसं वाटलं तें घेतांना तिनं रूढ नीतिकल्पनांची क्षिति बाळगली नव्हती. परंतु डिनोचं प्रेम जरी तिला हवं होतं, त्याची प्रेयसी होण्यांत जरी तिला आनंद वाटत होता, तरी त्याची पत्नी होण्यास तिचं मन एकदम तयार होईना. इटालियन लोकांशीं जरी तिचा थोडाफार परिचय झाला होता, तरी ते आपल्या लग्नाच्या बायकोशीं कसे वागतात, त्यांच्या संसारविषयक कल्पना कशा असतात, इत्यादि गोष्टींविषयी ती बहुतांशी अज्ञानांत होती. पति या नात्यानं डिनो आपल्याला सुखी करीलच अशी खात्री तिला वाटेना. तो जेव्हां जेव्हां लग्नाची गोष्ट काढी तेव्हां ती म्हणे, " मला विचार केला पाहिजे. "

पण अशा अनिश्चितींत ती असतांना तिला संशय आला कीं, आपल्याला दिवस गेले असावेत. मग मात्र डिनोच्या म्हणण्याला रुकार द्यायचं तिनं मनाशीं ठरविलं. आणि प्रारंभीं या कादंबरींतलं एकच विस्मयस्थळ म्हणून ज्या प्रसंगाचा मीं निर्देश केला तो या ठिकाणींच घडला !

रात्रीच्या जेवणाच्या वेळी डिनोला आपलं मनोगत सांगण्याचं जेनीनं ठरविलं होतं. अगदीं उत्तम जेवण तयार करावं म्हणून ती कांही जिनसा खरेदी करण्यासाठीं बाजारांत गेली. आणि त्या ठिकाणीं तिच्या दृष्टीस एक भयंकर गोष्ट पडली. ज्या दुकानांत ती उभी होती त्याला लागूनच बरींचशीं नायकिणींचीं घरं होतीं. त्यांपैकीं एका घरांतून दोन झिंगलेले पुरुष बाहेर पडले, व आरडाओरडा करीत समोरच्या तसल्याच एका घरांत शिरले. त्यांपैकीं एक डिनो होता !

तो प्रकार पाहतांच जेनीचा विचार पार बदलला. ती तावडतोब फ्लॉरेन्स शहर सोडून हेस्टरकडे परत आली. डिनोच्या घरांतून निघण्यापूर्वी तिनं फक्त एक लहानसं पत्र त्याच्यासाठीं ठेवलं. आपण कां निघून जात आहोंत त्याचं कारणहि तिनं त्यांत स्पष्ट लिहिलं.

परंतु डिनोबद्दलचा तिचा गैरसमज लवकरच दूर झाला. कारण खरा प्रकार घडला होता तो असा कीं, डिनोचा भटक्या खलाशी भाऊ 'उंबेरटो' अकस्मात् फ्लॉरेन्सला त्या दिवशीं परत आला होता व मनस्वी दारू झोकून नायकिणींच्या घराघरांतून हिंडून त्यानं दंगामस्ती सुरू केली होती. त्याला आवरून घरीं नेण्यासाठीं डिनो त्याच्या मागोमाग धावत होता. जेनीला तो भलत्याच घरांत शिरतांना दिसला त्याचं वास्तविक कारण हें होतं.

हा सारा प्रकार सांगायला 'उंबेरटो' स्वतः जेनीच्या गांवीं आला. तो तिला म्हणला,

"तूं गेल्यापासून डिनोनं खाणंपिणं वर्ज्य केलं. मोठ्या मुष्किलीनं मीं त्याला अन्नसेवन करायला लावलं. दोन वेळां तर नदींत जीव द्यायला तो निघाला होता. तूं परत आली नाहींस तर त्याचं लक्षण कांहीं ठीक दिसत नाहीं; त्याच्याकडे पाहिलं कीं वाटतं—पण मीच इतका वेळ सारखं बोलतों आहे. आतां काय तें बोलायची पाळी तुझी आहे."

त्यानं जेव्हां बोलणं संपविलं (कादंबरीकार सांगतो) तेव्हां जेनी खुळ्यासारखी त्याच्याकडे पाहत राहिली. तिनं बोलण्यासाठीं तोंड उघडलं परंतु शब्द बाहेर पडेनात. आपल्याला काय सांगायचं आहे तें तिला अगदीं पक्कं ठाऊक होतं. परंतु कां कुणास ठाऊक तिची वाचाच एकदम नष्ट झाली होती. आणि मग एकदम तिच्या लक्षांत एवढंच आलं कीं आपलं सारं अंग भयंकर कापूं लागलं आहे.

त्याच क्षणीं दरवाजा ढकलला गेला व हेस्टर आंत आली.

" तूं आहेस होय–? मला वाटलं—"

जेनीची वाचा एकदम परत आली. ती म्हणाली, " आई, जाऊं नकोस. हा कोण माहीत आहे तुला ? डिनोचा भाऊ. उंबेरटो. तो मला इटलीला परत घेऊन जाणार आहे."

हेस्टर दचकली, पण मग लगेच हसली.

जेनीनं खुलासा केला, " आई, माझीच चूक होती सारी."

हेस्टर म्हणाली, " मी मनांतून ओळखूनच होतें तें."

" तें कसं ? "

" कसं ! तूं डिनोच्या ज्या हकीगती सांगितल्यास त्यावरून माझी खात्री झाली कीं, बायकोला काय हवं असतं तें पक्कं ओळखणाऱ्या पुरुषांपैकीं तो आहे."

कमरेचं फडकं वर उचलून तिनं डोळ्यांला लावलं व जातां जातां दारांतून वळून ती उंबेरटोला म्हणाली, " थांबा हं. मी तुम्हांला प्यायसाठीं थोडं मद्य आणतें."

कथानकाच्या या सारांशावरून कादंबरीचं स्वरूप वाचकांच्या लक्षांत आलं असेल, व हिचा प्रास्ताविक परिचय करून देतांना ज्या गोष्टी मीं सांगितल्या त्यांतला अभिप्राय आतां त्यांना अधिक समजेल. ही कादंबरी ज्या वेळीं मीं प्रथम वाचली त्या वेळीं ती संपविल्याबरोबर माझ्या मनांत एक प्रश्न आला. या कादंबरीच्या द्वारें लेखकाला एखादं तत्त्व सूचित करायचं आहे काय ? करायचं आहे असं म्हणतां येईल. मात्र तें तत्त्व म्हणजे नीतितत्त्व किंवा उपदेश नव्हे. साधं निसर्गशास्त्राचं एक तत्त्व आहे तें. एक तर कादंबरी-कारानं असं दाखविलं आहे कीं, 'चाळिश्या ॲमॉस'च्या रक्तांत–किंबहुना एकंदर आरबूर्न वंशाच्या रक्तांत–जी बंडखोरपणाची प्रवृत्ति

होती तीच तीन पिढ्या उलटल्या तरी जेनीच्या रक्तांत उसळत होती, व तिच्या वांट्याला आयुष्यांत जीं सुखदुःख आलीं त्यांच्या मुळाशीं तिची ती विशिष्ट प्रवृत्तीच होती. या खेरीज आणखीहि एक गोष्ट सूचित करण्याचा लेखकाचा उद्देश दिसतो, व तिला नीति-तत्त्वाचा थोडासा वास येतो असं वाटल्यास वाचकांनीं म्हणावं, ती गोष्ट म्हणजे हेस्टरच्या एका महत्त्वाकांक्षेची विफलता. आपल्या ह्यूबर्टच्या समागमापासून आपल्या पोटीं आलेल्या मुलीला उच्च-वर्णीय खानदानी स्त्री बनविण्याची हेस्टरची इच्छा होती, परंतु ती सफल झाली नाहीं. जेनी शिकलीसवरली, पदवीधर झाली, सुसंस्कृत बनली, मोठ्या लोकांचे शिष्टाचार ती शिकली; परंतु अखेर तिनं एका सामान्य माणसावरच प्रेम केलं व त्याच्याशींच लग्न केलं. कण्हेरीच्या झाडावर गुलाब फुलूं शकत नाहींत हें सिद्ध झालं!

मला ही कादंबरी विशेष आवडली ती तिच्या प्रामाणिकपणा-बद्दल. शेतकरी, कामकरी, इत्यादि श्रमजीवी लोकांचं जीवित रंग-विण्याचा जो हेतु फ्रीमननं ही कादंबरी लिहितांना मनाशीं ठेवला त्याच्याशीं त्यानं सतत इमान राखलं आहे. त्या लोकांच्या आशा-निराशा, त्यांच्या ओबडधोबड नीतिकल्पना, त्यांचे गुण, व त्यांचे अनाचार इत्यादींचीं चित्रं काढतांना त्यांवर प्रतिष्ठेची खोटी सफाई त्यानं कुठेंहि केली नाहीं. कादंबरींतल्या पात्रांचं कित्येक प्रसंगींचं वर्णन वाचतांना पांढरपेशा वाचक चांग-लाच दचकण्याचा संभव आहे. परंतु वाचकाला असा धक्का बसल्यास त्याचा दोष लेखकाकडे नाहीं. त्याचा वर्ण्य विषयच त्या स्वरूपाचा आहे. 'जॉन स्टाइनबेक' यांची 'ग्रेप्स ऑफ राथ' ही कादंबरी वाचतांनाहि तिच्यांतील पात्रांचीं बोलणीं चालणीं पाहून वाचक असाच दचकतो. पण त्याचंहि कारण असंच, कीं ज्यांच्या वडिला-र्जित जमिनी व घरदारं आधुनिक यांत्रिक युगांतल्या भांडवल-

दारांनीं बळकावलीं आहेत व नवा आसरा शोधण्यासाठीं जे कॅलिफोर्नियाकडे भटकत चालले आहेत अशा आपद्ग्रस्त ओबडधोबड वृत्तीच्या साहसी दलितांची ती एक कथा आहे. फ्रीमनच्या प्रस्तुत कादंबरींतले लोकहि अशाच ओबडधोबड वृत्तीचे आहेत. त्यांचा हा धसमुसळेपणा जसाच्या तसा फ्रीमननं रंगविल्यामुळे कादंबरीला विशेष शोभा आली आहे. आणि या लोकांच्या या दांडगेपणाच्या खडकांतून प्रीतीचे किंवा निष्ठेचे लहान लहान सुंदर प्रवाह वाहत असलेले ज्या ज्या स्थलीं लेखकानं दाखविले आहेत तीं तीं स्थलं तर फारच रमणीय वाटतात. अशा हृद्य प्रसंगांपैकीं एकच उदाहरणादाखल थोडक्यांत सांगतों.

'चार्ली फुल्चर' हा एक साधा हरहुन्नरी भटक्याच खरा, परंतु हेस्टरच्या प्रीतीमुळें त्याच्यांत विलक्षण क्रांति झाली. तिच्याशीं संसार करूं लागल्यापासून तो अधिक उद्योगी व स्थिर तर झालाच, परंतु त्याचे दुराचारहि कसे नाहींसे झाले तें लेखकानं मोठ्या मर्मज्ञपणानं सांगितलं आहे. ज्या प्रसंगीं 'आतां पुन्हा मी कधीं दारूनं बेहोष होणार नाहीं' असं तो हेस्टरला वचन देतो तो वाचकांनीं मूळ कादंबरींत आवश्य पाहावा (पृ. १७४–१७५). आणि दुसरा एक प्रसंग असाच अंतःकरण हलविणारा आहे. हेस्टरला दिवस गेलेले असतांना चार्ली एका चवचाल मुलीशीं व्यभिचार करतो, परंतु घरीं परत येत असतांना त्याचं निष्कपट अंतःकरण त्याला सारखं खात असतं. घरीं परत आल्यावर त्याची चर्या अपराध्यासारखी दिसते. हेस्टरशीं बोलतांना तिच्या नजरेला नजर लावण्याचं धाडस त्याला होत नाहीं; व ती जेव्हां म्हणते,

"कांहीं तरी मूर्खपणा करून आला आहेस तूं. बोल काय केलंस?"

तेव्हां तिच्याशीं कोणतांहि कपट न करण्याची त्याची इच्छा

इतकी तीव्र कीं, खरा प्रकार तो कसाबसा सांगून टाकतो. या पुढचं कादंबरींतील वर्णन जसंच्या तसंच खालीं देतोः—

" बोलतां बोलतां चार्लीचा आवाज अस्पष्ट झाला आणि त्यानं आपली मान खालीं केली.

क्षणमात्र अगदीं गोंधळून गेल्याप्रमाणें हेस्टर त्याच्याकडे पाहत राहिली, आणि मग कोणत्याहि प्रकारें सूचना न देतां एकदम तिनं त्याच्या सणसणीत श्रीमुखांत भडकावली.

संतापानं तिचे डोळे नुसते जळत होते. एकावर एक तडाखा चढवीत ती ओरडूं लागली, ' घे आणखी, ही घे, ही आणखी...

आपल्या अंगचं सर्व बळ एकवटून तिनं त्याच्या गालावर चार तडाखे लगावले. परंतु चार्लीनं यत्किंचितहि प्रतिकार केला नाहीं. आपला गाल त्यानं झाकला देखील नाहीं. त्यानं आपलं मस्तक जसंच्या तसं खालीं ठेवलं होतं, व जमिनीकडे दृष्टि लाविली होती. जी बेइमानी त्याच्या हातून घडली होती तिची हकीकत खुळ्या-सारखी सांगून टाकण्याचा त्याचा प्रथम हेतु नव्हता, परंतु हेस्टरनं विचारतांच ती त्याच्या तोंडून बाहेर पडली होती. त्यानं मूर्खपणा केला होता, आतां हेस्टर करील ती शिक्षा त्याला सोसायला हवी होती. आयुष्यांत कधीं वाटलं नसेल इतकं त्याला वाईट वाटलं आणि मग, तिनं मारणं बंद केलं हें कळण्यापूर्वींच, आपल्या फणफणाऱ्या कढत गालाला कसला तरी गार स्पर्श झाल्याचं त्याच्या लक्षांत आलं. त्यानं पाहिलं तों हेस्टरनं प्रेमभरानं त्याला घट्ट मिठी मारली होती ! "

अशीं सुंदर वर्णनं या कादंबरींत किती तरी आहेत ! आणि वाचकांचं चित्त सारखं जखडून ठेवणारा या पुस्तकांतला विशेष हा कीं, या सर्व प्रसंगांना साजेसं भाषेचं सामर्थ्य लेखकाजवळ आहे. कादंबरींतले स्त्री-पुरुष जसे वर्तनानं दांडगे व उच्छृंखल,

राकट अन् ओबडधोबड, तशीच लेखकाची भाषाहि दांडगी आणि अनिरुद्ध आहे. ही कादंबरी वाचीत असतां डॉ. क्रोनिन यांची 'हॅटर्स कॅसल' ('मनोहरची आकाशवाणी;' प्र. ६ वें पाहा) मला पुनः पुन्हा आठवत होती. सामर्थ्यशाली भाषेचा दांडगा स्रोत कसा असतो तो त्या कादंबरीप्रमाणेंच 'हेस्टर व तिचं कुटुंब' या कादंबरींतहि पुरेपूर पाहावयास सापडतो. जीं वर्णनं दुबळ्या लेखकाच्या हातीं कंटाळवाण्या पाल्हाळासारखीं वाटलीं असतीं त्यांनाच भाषेच्या अपूर्व ओघामुळें व शक्तीमुळें केवढं सौंदर्य चढवितां येतं त्याचा अभ्यास ज्यांना करावयाचा असेल त्यांनीं फ्रीमनची ही कादंबरी जरूर वाचावी. लक्षपूर्वक वाचावी असं मी म्हणतच नाहीं, कारण मार्मिक वाचकानं तिचं वाचन एकदां सुरू केल्यावर त्याचं लक्ष त्यांत सारखं गुंतून राहिलंच पाहिजे याबद्दल मला संशय नाहीं.

---

## ५ : : लक्ष्मीचा शाप

मृत्युपत्रांतल्या एखाद्या विचित्र कलमामुळें तें करणाऱ्याच्या ध्यानींमनींहि नसेल अशी विचित्र परिस्थिति झाल्याचीं अनेक उदाहरणं आहेत. असलं एखादं उदाहरण वाचकांना प्रत्यक्ष माहीतसुद्धा असेल. त्याप्रमाणेंच माणसाला एकदां पैशाचा लोभ सुटला कीं त्याच्या प्राप्तीसाठीं तो कोणतं साहस करील त्याचा नेम नाहीं, हा मनुष्यस्वभावाबद्दलचा सिद्धान्त कांहीं नव्यानं सांगायला नको. मृत्युपत्रांतली भानगड आणखी मनुष्याचा स्वाभाविक धनलोभ हीं दोन एकत्र केलीं तर किती भयंकर स्वरूपाचं स्फोटक द्रव्य तयार होईल, आणि त्याचा एखाद्या कुटुंबावर किती घातुक परिणाम होऊं शकेल याचा वाचकांनीं कधीं विचार केला आहे ?

ज्या कादंबरीचा परिचय मी आतां करून देणार आहे तिचं कथानक या विचारावरच आधारलेलं आहे. 'नाओमी रॉइड स्मिथ'च्या "For Us In The Dark" (मॅक्मिलन् अँड को., किंमत आठ शिलिंग सहा पेन्स) या कादंबरींत व्हायोलेट नांवाच्या स्त्रीनं आपल्या सासऱ्याच्या मृत्युपत्रांत लिहून ठेवलेली संपत्ति मिळविण्यासाठीं एक विलक्षण गुप्त साहस कसं केलं, व त्या साहसाचे दुष्परिणाम अखेर सबंध कुटुंबाला कसे भोगावे

लागले त्याचं वर्णन केलेलं आहे. ही सबंध कादंबरी वाचण्यासारखी नाहीं. तिचा सहाशें-चाळीस पृष्ठांचा विस्तार अगदीं निष्कारण आहे. तीनशेंच पृष्ठांत सबंध कथानकाची मांडणी केली असती तर ती अधिक आकर्षक झाली असती. कादंबरींत नको त्या गोष्टींचीं वर्णनं पुष्कळ आहेत, आणि आगंतुक पत्रांबद्दल कंटाळवाणे पाल्हाळ अनेक ठिकाणीं केलेले आहेत. आपल्या पतीलाहि न कळवितां आपल्या पोटीं एक कन्या आली अशी बतावणी केवळ इस्टेटीच्या लोभानं व्हायोलेटनं केली खरी, पण प्रतारणेनं मिळविलेल्या संपत्तीचा शाप अखेर व्हायोलेटला, तिचा पति 'पीटर' याला आणि तिची (?) कन्या 'फ्रान्सी' या सर्वांना भोगावा लागला, एवढाच 'For Us In The Dark' या कादंबरीच्या कथानकाचा गाभा आहे. योग्य संयम राखून हें शोकपर्यवसायी कथानक सजविलं गेलं असतं तर कादंबरी पहिल्या प्रतीची झाली असती. आज वस्तुस्थिति अशी झाली आहे. कीं, कादंबरीच्या एकंदर तीन भागांपैकीं पहिला भागच तेवढा सरस वाटतो आणि त्या भागाचींसुद्धा पहिलीं शंभर पानंच काय तीं अतिशय आकर्षक वाटतात. हीच गोष्ट निराळ्या शब्दांत सांगायची तर असं म्हणतां येईल कीं, 'For Us In The Dark' या कादंबरीचा विषय मोठा चमत्कृतिपूर्ण आहे, आणि कथानकाचा एकंदर विस्तार जरी विस्कळित असला आणि पहिल्या पेचप्रसंगांतून निर्माण झालेल्या परिस्थितीचा ताण जरी शेवटपर्यंत कायम राहिलेला नसला तरी तो पहिला पेचप्रसंग फारच नाट्यपूर्ण आहे, आणि त्या प्रसंगाची निर्मिति ज्या कौशल्यानं केली गेली आहे तें अगदीं अभ्यास करण्यासारखं आहे.

कादंबरीचा मुख्य विषय काय तें मीं वर सूचित केलंच आहे. व्हायोलेट आणि पीटर असं एक जोडपं; व्हायोलेटची चाळिशी उलटून गेली तरी तिला मूल झालेलं नाहीं अशी

परिस्थिति; पीटरच्या आत्याच्या नवऱ्यानं आपली भली जंगी इस्टेट पीटरला मूल झालं तर त्याला अन् त्याच्या मुलांबाळांना मिळावी असं विचित्र मृत्युपत्र केलेलं! पीटरच्या विधवा आत्यानं त्याला कधीं काळीं मूल होईल ही आशाच सोडून दिलेली! व्हायोलेट श्रीमंतीची फार भुकेली, गरिबीच्या संसाराला कंटाळलेली! आपल्याला मूल झालं तर एकदम गडगंज संपत्ति आपल्या घरांत चालून येईल हें तिला उघड दिसत असूनहि त्याचा काय उपयोग होता? तिला मूल झाल्यावांचून ती संपत्ति मिळविण्यासारखी नव्हती, आणि या बाबतींत दैव तिच्यावर कायमचं रुसलेलं...

पण अशा निराशेच्या अंधारांत जीवनाचा मार्ग आक्रमीत असतांना एक दिवस व्हायोलेटला एकदम आशेचा किरण दिसला. आणि तो दिसतांच तिच्या मनांत एक विलक्षण साहस आलं. या साहसांतूनच कादंबरींतला पहिला पेचप्रसंग निर्माण झालेला आहे. एकंदर कादंबरी कितीहि सदोष असली तरी या पहिल्या पेचप्रसंगाची मौज असामान्य आहे. म्हणून त्याची विस्तारानं फोड करून सांगतों.

पुष्कळदां असं होतं कीं माणसाच्या मनांत एखादी चांगली किंवा वाईट कल्पना येते ती केवळ एखादा क्षुल्लक योगायोगानं. त्या कल्पनेचे परिणाम त्या एकट्या माणसालाच नव्हे तर त्याच्याबरोबरच्या अनेकांना भोगावे लागतात. पण त्या मोठमोठ्या घटनांचं बीज त्या माणसानं रात्रंदिवस विचार करून ठरविलेल्या कल्पनेंत नसतं, तर अगदीं एखाद्या साध्या योगायोगानं त्याच्या मनांत उद्भवलेल्या कल्पनेंत असतं!

व्हायोलेटच्या बाबतींत असंच झालं. आपल्याला आतां मूल होणं शक्य नाहीं, असं समजून ती चालली होती. इस्टेट मिळ-

विण्यासाठीं कांहीं कपट करतां येईल ही कल्पनाहि तिला कधीं शिवली नव्हती. पण एके दिवशीं अकल्पितपणें असा एक प्रसंग घडला, कीं त्यामुळें कपटाची कल्पना 'व्हायोलेट'च्या मनांत प्रविष्ट झाली, आणि ती झाल्याबरोबर साध्या भोळ्या निराशामग्न 'व्हायोलेट'ला आशेचा मार्ग एकदम दिसून ती एक कपटी खल-स्त्री बनली !

हा प्रसंग किती साधा आहे अन् किती सहजासहजीं घडवून आणलेला आहे तेंच आपल्याला मुख्यतः लक्षांत घ्यायचं आहे. कारण, कादंबरींतल्या पहिल्या पेचप्रसंगाची सारी बहार या योगायोगाच्या सहजपणांत आहे.

महायुद्ध चालू असतांना १९१७ सालच्या डिसेंबर महिन्यांत पीटर चार दिवसांच्या रजेवर घरीं आला. हे चार दिवस त्यानं व व्हायोलेटनं एकत्र घालविले व रजा संपतांच पीटर परत युद्धावर गेला. "पीटर येऊन गेला, पण रजा अगदींच थोडी असल्या-कारणानं तुमची भेट घ्यायला त्याला येतां आलं नाहीं," असं सांगण्यासाठीं व्हायोलेट पीटरच्या आत्याबाईकडे गेली. आपला भाचा रजेवर आला तो आपल्याला न भेटतां गेला हें ऐकून म्हातारीला कांहीं बरं वाटलं नाहीं; पण त्यांतल्या त्यांत तिनं समाधानाला जागा काढली ती अशी, कीं चार दिवस का होईना, पीटर व व्हायोलेट या दोघांनीं एकत्र घालविले हें बरं झालं. त्याचा काय नेम, पुष्कळ बायकांना पन्नाशीच्या सुमाराला पहिलं मूल होतं. म्हातारीनं तसं बोलून दाखवायलाहि कमी केलं नाहीं. व्हायोलेटला तिनं दोन तीनदां बजावलं, 'एखाद्या डॉक्टरकडे जाऊन स्वतःची तब्येत दाखव अन् मला कळव तो काय म्हणतो तें.' व्हायोलेटला मनांतल्या मनांत पक्कं माहीत होतं, कीं म्हातारीची

कल्पना व्यर्थ आहे. पण तिनं आपलं तोंडापुरतं 'हो-हो, जाईन डॉक्टरकडे' असं म्हटलं.

सासूबाईचा निरोप घेऊन ती निघाली ती अगदीं खिन्न मनःस्थितींत. आपल्या वांझपणाची तिला अगदीं मनस्वी खंत आली. त्या वेळीं ट्रॅमच्या नाक्यापर्यंत ती चालत गेली ती अगदीं जड अंतःकरणानं. तिला खोकल्याच्या गोळ्या विकत घ्यायच्या होत्या त्या घ्याव्या अन् मग ट्रॅम पकडावी अशा विचारानं ती एका लहानशा दुकानांत शिरली.

ती ज्या वेळीं दुकानांत शिरली त्या वेळीं दुकानाच्या मालकाचं अन् एका उंच गोऱ्या मुलीचं कशावरून तरी भांडण चाललं होतं.

ती मुलगी म्हणत होती, " पण मीं वरच्या वेष्टनाचं सीलसुद्धां फोडलेलं नाहीं हें दिसत नाहीं तुम्हांला ? "

चष्मेवाला दुकानदार डोळ्यांची उघडझाप करीत म्हणत होता, " पण तेवढ्यावरून तुम्ही तें इथेंच खरेदी केलंत असं कांहीं सिद्ध होत नाहीं."

" नाहीं कसं ? तुमच्या बायकोनं— बायकोच असावी तुमची ती— मला पावती दिली नाहीं त्याला मी काय करूं ? पण गेल्या शनिवारीं मीं ते औषध इथंच विकत घेतलं. तुमच्या वहींत नोंद असेल कीं, बघा."

" या औषधाच्या पांचपंचवीस बाटल्या रोज खपतात आमच्याकडे. नोंद कुठें ठेवीत बसूं आम्ही ? "

" बरोबर आहे, असल्या औषधाची नोंद कशाला ठेवाल ? "

" हें पाहा, इतक्याच किंमतीचा दुसरा वाटेल तो माल तुम्हांला बदली विकत द्यायला मी तयार आहे. यापेक्षां अधिक मी कांहीं एक करूं शकत नाहीं."

" मला माल नको. पैसे परत हवे आहेत."

" आम्ही पैसे कधींच परत देत नाहीं."

" पण माझ्याजवळ आतां एक पैसुद्धां नाहीं."

दुकानदारानं तिच्या ऐटबाज पोषाखाकडे पाहिलं अन् म्हटलं, " कोपऱ्यावर एका मारवाड्याचं दुकान आहे तिथं वस्तु गहाण घेऊन पैसे देतात."

" अस्सं ! " असं संतापानं उद्गारून पाठ फिरवून ती मुलगी दाराकडे गेली.

दुकानदार तिला ओरडून म्हणाला, " अहो, तुमचं हें औषध राहिलं ना इथंच."

" घाल तें तुझ्या डोंबलावर " असं चिडून ओरडून धाड्दिशीं दरवाजा लोटून ती मुलगी बाहेर पडली.

मग दुकानदाराचं लक्ष व्हायोलेटकडे गेलं. तिला हव्या असलेल्या खोकल्याच्या गोळ्या काढायसाठीं तो जरा दूर गेला तेव्हां त्या मुलीनं टाकलेल्या औषधाच्या डबीवरचं नांव वाचतांच ती चमकली.

बंद झालेला विटाळ पुन्हा सुरू होण्याचं औषध होतं ते !

अस्सं ! अशा चमत्कारिक संकटांत ती मुलगी होती तर !

व्हायोलेटच्या मनांत आलं, काय दैवाचा लहरीपणा बघा ! जें एका व्यक्तीचं इच्छासाफल्य तेंच दुसऱ्या व्यक्तीला संकट वाटावं. त्या मुलीला जी स्थिति प्राप्त झाली होती ती तिला नको होती, उलट तीच स्थिति आपल्याला हवी आहे, पण प्राप्त होत नाहीं !

औषध घेऊन व्हायोलेट ट्रॅमच्या नाक्यावर गेली तों मघाशी दुकानांतून फणकाऱ्यानं बाहेर पडलेली ती मुलगी तिथें उभी असलेली तिला दिसली. ट्रॅम आल्यावर व्हायोलेट तींत शिरली. कंडक्टर तिकीट विचारायला आला तेव्हां ती त्याला म्हणाली,

" व्हिक्टोरिया, एक."

कंडक्टर म्हणाला, " पण तुमच्याबरोबर ट्रॅममध्यें शिरलेली ती मुलगी दुसऱ्या मजल्यावर बसली आहे. तिचं तिकीट तुम्हीच काढणार आहांत असं ती म्हणाली."

व्हायोलेटला फार आश्चर्य वाटलं. पण वरच्या मजल्यावर बसलेली मुलगी कोण तें तिनं ताबडतोब ओळखलं. आपलं आश्चर्य मनांतल्या मनांत ठेवून तिनं तिचं तिकीट काढलं, अन् कंडक्टरला सांगितलं, " तिला म्हणावं मीं खालीं बोलावलं आहे, पुष्कळ जागा आहे इथं."

ती मुलगी खालीं आली.

तिची वेषभूषा आणि कपडेलत्ते एखाद्या सुखवस्तु कुटुंबांतल्या सुशिक्षित स्त्रीला साजेसेच होते. ती चांगलीच देखणी होती. ती अगदीं जवळ येऊन उभी राहिल्यावर व्हायोलेटनं तिच्याकडे पाहिलं, तों तिच्या मुद्रेवर कृतज्ञतेऐवजीं बेदरकारपणाच तिला दिसला.

ती व्हायोलेटच्या समोर उभी राहिली आणि म्हणाली,

" काय शिक्षा करणार आहांत मला ?"

तिच्या त्या विचित्र प्रश्नानं व्हायोलेट गोंधळून गेली. तिनं विचारलं,

" अशी फसवेगिरी तूं नेहमीं करतेस का ?"

" नाहीं. आज पहिल्यांदाच केली."

" एर्वीतेर्वी मीं तुझं तिकीट काढलं आहे, मग बैस कीं !"

" थँक्स ! तुमच्या शेजारीं बसूं का ?"

" अर्थात्."

ती मुलगी बसली. जरा वेळानं तिनं विचारलं," तुम्हांला एखादी सैंपाकीणबाई हवी असेल कीं ! मी फार छान सैंपाक करतें."

जरा वेळ मनाशीं विचार करून व्हायोलेट म्हणाली, " इथं ट्रॅममध्यें आपल्याला बोलतां यायचं नाहीं. व्हिक्टोरियावर उतरल्यावर आपण एका हॉटेलांत जाऊं अन् तिथं बोलूं. तुझी कांहीं हरकत नाहीं ना."

" हरकत? खरं म्हणजे माझ्या पोटांत सकाळपासून कांहीं नाहीं."

हॉटेलांत जें बोलणं झालं त्यावरून व्हायोलेटला त्या मुलीची बरीचशी हकीगत कळली. तिचं नांव मार्जोरी बेन्स असं होतं. युद्धावरून परत आलेल्या एका तरुणापासून तिला गर्भ राहिला होता. त्या तरुणाच्या सहवासांत तिनं तीन रात्रीं काढल्या होत्या आणि मग तो परत युद्धावर गेला होता. रजेवांचून गैरहजर राहिल्यामुळें तिची नोकरी गेली होती. तिच्याजवळचं तें गर्भपाताचं औषध पाहून तिच्या सावत्रआईनं तिला घराबाहेर काढलं होतं.

मार्जोरीची ही हकीगत ऐकत असतांना व्हायोलेटच्या मनांत एकदम आलं, हिला होणारं मूल आपल्यालाच झालं अशी बतावणी करतां आली तर!... अशा कपटनाटकानं या मुलीची बेअब्रू आपल्याला टाळतां येईल, अन् आपला स्वतःचा केवढा तरी फायदा करून घेतां येईल!...

आपल्याला मूल झालं हें कांहीं पीटरला खोटं वाटायचं नाहीं. त्यानं चार दिवस आपल्या सहवासांत घालविले होते आणि आपल्याला दिवस गेले यावर पीटरच्या आत्याबाईचाहि विश्वास बसणं अवघड नाहीं!...

एखादा गुन्हा करण्याची कल्पना मनुष्याला एकदां आली, कीं ती नीट पार पाडण्याच्या युक्त्या त्याला सुचायला कांहीं वेळ लागत नाहीं. व्हायोलेटच्या बाबतींत असंच झालं. साऱ्या जगाला फसविण्याचं साहस तिला करायचं होतं; आणि जगाला

फसवण्यासाठीं मुख्यतः तीन व्यक्तींची फसवणूक तिला साधायची होती. पीटर आणि त्याची आत्या यांची अशी समजूत तिला करून द्यायची होती, कीं तिला स्वतःलाच अपत्य झालं. मार्जोरी-चीहि फसवणूक तिला करायची होती. कारण मोठी इस्टेट मिळविण्याच्या उद्देशानं तिच्या मुलाला आपलं म्हणायला आपण तयार झालों आहोंत याचा अंधुकसुद्धां संशय तिला येतां कामा नये हें व्हायोलेट पूर्णपणे जाणून होती. मार्जोरीची अशीच समजूत करून देणं व्हायोलेटला भाग होतं, कीं तिला ऐन संकटाच्या वेळीं आश्रय देण्यांत अन् तिच्या अपत्याचा स्वीकार करण्यांत केवळ परोपकारबुद्धीखेरीज तिचा दुसरा कसलाहि हेतु नव्हता.

सारांश, व्हायोलेटला जो कपटव्यूह रचायचा होता तो कांहीं सरळ सोपा नव्हता. पण वेळच आली कीं माणसाचं सारं बुद्धि-कौशल्य चांगल्या अगर वाईट मार्गानं काम करूं लागतं हेंच खरं. मार्जोरीशीं तिनं असा करार केला, कीं दोघींनीं मिळून तावडतोब एका दूरच्या खेड्यांत जाऊन राहावं. तिथें मार्जोरीनं मिसेस व्हायोलेट कॉम्पर हें नांव धारण करावं आणि व्हायोलेटनं मार्जोरी बेन्स म्हणून राहावं, व बाळंतपणानंतर हिंडायफिरायपुरती ताकद आली कीं, मार्जोरीनं आपलं अपत्य व्हायोलेटजवळ ठेवून आपला रस्ता सुधारावा.

पीटरला फसवणं अगदींच सोपं होतं. तो युद्धावर गेला होता आणि व्हायोलेटचा कपटव्यूह पार पडून मार्जोरी निघून जाईपर्यंत तो परत येण्याचा मुळींच संभव नव्हता.

राहतां राहिली पीटरची आत्याबाई. तिला अगदीं बेमालूम फसवणं अवश्य होतं; कारण मृत्युपत्राची वहिवाटदार ती होती. व्हायोलेटला मूल झालं याबद्दल तिला काडीमात्र संशय येऊन उपयोग नव्हता. म्हातारीला सफाई फसविणं ही सर्वांत अवघड

गोष्ट होती. पण व्हायोलेटच्या स्वभावांतला सारा कावेबाजपणा आतां एकवटून जागा झाला होता. तिनं या अडचणींतूनहि फार शिताफीनं मार्ग काढला. लंडनच्या एका कोपऱ्यांतल्या एका बिनओळखीच्या डॉक्टरकडे ती मार्जोरीला घेऊन गेली, त्या डॉक्टरला स्वतःचं नांव मिस् बेन्स असं तिनं सांगितलं, आणि मार्जोरीकडे बोट दाखवून ती म्हणाली, " ही माझी भाची. हिचं नांव मिसेस कॉम्पर. हिचा नवरा मधें थोड्याशा रजेवर आला होता. त्याला एक आनंदाची बातमी कळवितां आली तर हवी आहे. पण उगीच बायकी तर्क नको, चांगल्या डॉक्टरचं मत घेतलेलं बरं म्हणून हिला तुमच्याकडे तपासणीसाठीं घेऊन आलें आहे."

त्या डॉक्टरला ही सारी बतावणी खोटी वाटण्याचं कांहींच कारण नव्हतं.

तपासणी झाली, सगळं कांहीं झालं, अन् डॉक्टरकडून परत आल्यावर व्हायोलेटनं आपल्या सासूला आणि मार्जोरीनं आपल्या सावत्रआईला पुढीलप्रमाणें पत्रं लिहिलीं:—

" प्रिय आत्याबाई,

नेहमींचे डॉक्टर लढाईवर गेले असल्यामुळं डॉ. वेब नांवाच्या एका डॉक्टरकडे मी ही आतांच जाऊन आलें. त्यानं माझी तपासणी करून जें मत लिहून दिलं तें मुद्दाम या पत्रासोबत धाडीत आहे. तें वाचून तुम्हांला खचित फार आनंद होईल. डॉ. वेबचा असा सल्ला आहे, कीं माझ्या सध्यांच्या अवस्थेंत मी लंडन शहरीं बिलकुल राहतां कामा नये. म्हणून साऱ्या गोष्टी सुखरूप पार पडेपर्यंत सहा-सात महिने एखाद्या चांगल्याशा शांत खेडेगांवांत मी जाऊन राहणार आहे. मिस् बेन्स नांवाच्या माझ्या एका

मैत्रिणीला मी बरोबर नेणार आहे. ती सैंपाक करील अन् माझी सर्व प्रकारची शुश्रूषाहि करील...

माझ्या या बातमीनं तुम्हांला फार आनंद होईल अशी माझी खात्री आहे. पीटरचं कालच एक पत्र आलं. तो अलेक्झांड्रियाला पोंचला असून सुखरूप आहे. साध्या प्रकृती-च्या मजकुरापलीकडे दुसरी कांहीं बातमी त्याच्या पत्रांत कुठून असायला? तुम्हांला माहीतच आहे, कीं येणारीं जाणारीं सारीं पत्रं सरकारकडून तपासलीं जातात.

पीटरला आतां लवकरच पितृपद प्राप्त होणार हें आनंदाचं वर्तमान मीं त्याला माझ्या पत्रांत कळवलं आहे. सेन्सॉरनं तें खोडून टाकलं नाहीं म्हणजे मिळवली!

तुमची लाडकी
व्हायोलेट"

मार्जोरीनं आपल्या सावत्रआईला लिहिलं—

"तूं मला घरांतून घालवून दिलंस तेव्हां माझ्यासारख्या मुलीचं वाटोळं झाल्यावांचून खास राहणार नाहीं असं तूं म्हणालीस; पण तुझं भविष्य कांहीं खरं झालं नाहीं येवढं तुला कळविण्यासाठींच हें पत्र लिहितें आहे. शिवाय असंहि मनांत आलं, कीं तुला पश्चात्तापाची लकेर आली अन् सावत्र मुलीच्या प्रेमाचा एकदम उमाळा आला, तर मी नाहींशी झाल्याची वर्दी तूं पोलिसांत देशील. तेव्हां तुला कळवावं, कीं मी घर सोडून गेलें असलें तरी सुखरूप आहे.

मिसेस कॉम्पर नांवाच्या एका बाईनीं मला नोकरीवर ठेवलेलं आहे. त्यांना दिवस गेलेले आहेत. येत्या

उन्हाळ्यांत त्या बाळंत होतील, मला घेऊन त्या एका मिवान्त खेड्यांत राहायला जाणार आहेत.

त्या दिवशीं मीं तें औषध आणलेलं पाहून तुला जो संशय आला तसला कांहीं प्रकार नाहीं अशी आतां खात्री झाली आहे माझी. मी मूर्खासारखी उगीचच भ्यालें होतें असं दिसतं. आतां कधीं काळीं मी तुझ्याकडे परत आलेंच तरी अगदीं सडी येईन, चिंता नको तुला.

माझीं कांहीं पत्रं आलीं असलीं, अन् तीं तूं आधींच नाहींशीं करून टाकलीं नसलींस, तर वर दिलेल्या पत्त्यावर पाठव.

**मार्जोरी."**

वाचकांच्या लक्षांत आलंच असेल, कीं आपल्या कपटाचा जो पाया व्हायोलेटनं रचला तो या दोन पत्रांच्या योगानं पूर्ण झाला. कपट रचणं फार सोपं आहे, पण तें जन्मभर संभाळणं फार दुर्घट आहे, या कल्पनेवरच 'For Us in The Dark' या कादंबरीच्या कथानकांतल्या पुढच्या साऱ्या घटनांची उभारणी झालेली आहे. सबंध कादंबरी वाचण्यासारखी नाहीं हें मीं प्रथमच सांगितलं. पण कादंबरींत जो पहिलाच पेचप्रसंग निर्माण करण्यांत आला आहे तो किती नाविन्यपूर्ण आहे, आणि ज्या एका साध्या योगायोगाच्या आधारावर तो पेचप्रसंग उत्पन्न होतो तो किती कौशल्यानं जुळवून आणलेला आहे तेंच मुख्यतः मला वाचकांच्या निदर्शनाला आणायचं होतं. व्हायोलेट आणि मार्जोरी यांची भेट केवळ योगायोगानंच झाली हें खरं; पण त्या भेटीचं वर्णन वाचतांना 'छे, अशी भेट होणं शक्य नाहीं' असं कुणाला क्षणभर तरी वाटेल काय? त्या दोन स्त्रियांच्या त्या अकल्पित पहिल्या भेटीवर कादंबरीचं सबंध कथानक उभं आहे, आणि ती भेट

अगदीं पूर्ण संभाव्य वाटते, हीच कथारचनेच्या कौशल्याची नमुनेदार कसोटी आहे.

मला माहीत आहे कीं सबंध कादंबरी वाचण्यासारखी नाहीं असं जरी मीं सांगितलेलं आहे, तरी वाचकांपैकीं कांहीं-जणांना तरी " पाहूं या तरी; कादंबरी बिघडवली आहे म्हणजे काय केलं आहे तें " असा मोह झाल्यावांचून राहणार नाहीं. हा मोह त्यांनीं आवरलाच पाहिजे असं मी कशाला म्हणूं? कादंबरींतल्या पहिल्या पेचप्रसंगाची जी तयारी मीं विस्तारानं वर्णन करून सांगितली ती वाचल्यावर वाचकांच्या जिज्ञासेला विलक्षण ताण बसल्यावांचून राहणार नाहीं. व्हायोलेटनं स्वतः-भोंवतीं जी मोठी चमत्कारिक आणि नाजुक परिस्थिति उत्पन्न केली तिच्या जाळ्यांत तिचे हातपाय कसे गुंतत गेले हें वाचून पाहावंसं त्यांना वाटावं हें अगदीं साहजिक आहे; आणि कथानकाचा जो भाग मीं पुढें मांडला त्याच्यापुढचासुद्धां सुमारें शंभर पृष्ठांचा भाग कांहींसा मनोरंजक वाटण्यासारखा आहे.

विशेषतः 'आपल्या गौप्याचा स्फोट केव्हां व कसा होईल त्याचा नियम नाहीं' या सतत भयापेक्षांहि मार्जोरीला झालेल्या मुलीवर आपल्या पोटच्या मुलीप्रमाणं प्रेम करतांना जें एक विचित्र सूक्ष्म शल्य व्हायोलेटच्या अंतःकरणांत रात्रंदिवस टोचूं लागलं त्याचं दिग्दर्शन प्रथम प्रथम फार चांगलं केलं गेलेलं आहे. व्हायोलेटची (?) मुलगी फ्रान्सी मार्जोरीप्रमाणं मोठी देखणी पण तिच्याप्रमाणेंच हट्टी, दुराग्रही, आणि दांडगी निघाली. ती जरा मोठी झाल्यावर तिला जेव्हां शाळेंत घालण्यांत आलं तेव्हां ती एक दिवस शाळेतून खुशाल पळून आली. या गोष्टीचा व्हायोलेटला मोठा धक्का बसला. तिचं मन तिला म्हणूं लागलं, 'संपत्तीच्या लोभानं भलतंच कपट केलंस खरं, पण आतां त्याचे

असे परिणाम व्हायला लागले तर तूं काय करशील ? ही तुझी मुलगी वाईट निघाली म्हणजे ?' ज्या ज्या वेळीं फ्रान्सीकडे ती टक लावून पाही त्या त्या वेळीं फ्रान्सीच्या रूपानं साहसी, बेदरकार मार्जोरीच आपल्यापुढें उभी आहे, आणि ती आतां जन्मभर आपला परोपरीनं छळ केल्यावांचून राहणार नाहीं अशा कल्पनेनं तिचं हृदय धडधडूं लागे. कधीं कधीं फ्रान्सी आपल्या दृष्टीसमोर सुद्धां नको असं तिला होई !

पुढच्या शोककारक घटनांची किती कौशल्यानं केलेली ही सूचना आहे, नाहीं काय ? कादंबरीचा जेवढा भाग मीं सांगितला त्याला साजेसा तिचा सगळाच विस्तार असता तर For Us In The Dark' या कादंबरीची गणना पहिल्या प्रतीच्या ललितकृतींत सहज करतां आली असती. तशी वस्तुस्थिति नाहीं ही खेदाची गोष्ट होय. पण नसेनात का या कादंबरींतल्या साऱ्याच गोष्टी नमुनेदार ? तिच्यांतला जेवढा भाग चांगला आहे तेवढाच वेचलेल्या मोत्यासारखा आपल्या संग्रहांत ठेवून त्यापासून शिकतां येईल तेवढं शिकायची रसिक वृत्ति आपल्या ठिकाणीं खचित आहे !

## ६ : : घात

मनोव्यापारांच्या सूक्ष्म निदर्शनाची गंमत जिच्यांत विशेष नाहीं, परंतु प्रसंगाच्या रचनाचातुर्याच्या योगानं जिला लेखकानं चित्तवेधकता आणली आहे अशी कादंबरी श्रेष्ठ, कीं कथानकाच्या रचनेकडे दुर्लक्ष करून केवळ आकर्षक स्वभाववर्णन व मनोव्यापार-दर्शन याबद्दल जिच्या लेखकानं जास्त दक्षता घेतली आहे अशी कादंबरी श्रेष्ठ, असा प्रश्न पुष्कळदां विचारण्यांत येतो. या प्रश्नाचं उत्तर मला कुणी विचारलं तर साहजिकच प्रथम मी असं म्हणेन कीं, हे दोन्ही गुण जिच्यांत आहेत ती कादंबरी पहिल्या प्रतीची, हें आधीं विसरतां कामा नये. आणि नंतर मात्र वर दर्शविलेल्या दोन्ही प्रकारच्या कादंबऱ्या आपापल्यापरी प्रशंसनीय मानल्या पाहिजेत. आधुनिक काळांतल्या सुसंस्कृत उच्च अभिरुचीला ललितकृतींतील मनोव्यापारदर्शनाचा विशेष मोह वाटावा हें क्रमप्राप्त आहे, व वाचकांच्या अभिरुचींतील या महत्त्वाच्या फरकाला अनुसरून कादंबरीकारांचं लक्ष ललितकृतीच्या इतर अंगांपेक्षां मानसशास्त्रीय चिकित्सेकडे अधिकाधिक वळलेलं दिसावं हेंहि साहजिकच म्हटलं पाहिजे. तथापि रुचीची ही नवी दिशा लक्षांत घेऊनहि मी असं म्हणेन कीं, कथानकाच्या

बांधेसूद व चमत्कृतिपूर्ण रचनेची शोभा कांहीं वेगळीच असते. अलीकडे 'मनोविश्लेषणात्मक' या ऐसपैस नांवाचा फायदा घेऊन कादंबऱ्या लिहिण्याचा सपाटा मराठी लेखकांनीं सुरू केला आहे. लघुकथेच्या प्रांतांतहि ही जातकुळी सांगून बरंच लिखाण वावरूं लागलेलं दिसतं. आणि या लिखाणाची प्रतिष्ठा ज्यांना आपल्या सोयीसाठीं वाढवून घ्यायची आहे असे लेखक रचनाप्रधान कादंबऱ्यांची व ज्या तंत्रविषयक प्रभुत्वामुळेच कथानकांत चमत्कृति आणतां येते त्या तंत्राचीहि हेटाळणी करतांना आढळतात. परंतु हा सारा धूर्त लबाडीचा, वाचकांची दिशाभूल करण्याचा डाव आहे. कथानकाची व तंत्रशुद्ध घडण करावयाची झाली तर त्याला अंगीं कल्पकतेची शक्ति असावी लागते. रेनॉल्ड्ससारखे जुने कादंबरीकार आधुनिक मनोविश्लेषणाच्या भानगडींत फारसे पडले नाहींत. परंतु म्हणून त्यांच्या कादंबऱ्या कनिष्ठ प्रतीच्या ठरतील काय? त्यांच्या एकेका ललितकृतीचा व्याप एवढा दांडगा, व त्या पसाऱ्यांतले लहानमोठे सांधे जुळविण्याची त्यांची कुशलता इतकी असामान्य, कीं ती पाहतांच वाचक स्तंभितच व्हावा. असल्या रचनाकौशल्याला मी तर एक प्रकारची शिल्पकलाच म्हणेन. ही शिल्पकला ज्यांच्या अंगीं नाहीं त्यांनीं आपल्या कल्पकतेचं दुर्भिक्ष्य लोकांच्या मनांत भरूं नये म्हणून तंत्राच्या निंदेच्या भेरी-तुतारी वाजवाव्या. त्यांचे आवाज कांहीं काल हवेंत तरंगतील, पण लवकरच विराम पावतील. थोड्यांची दिशाभूल होईल, पण ती देखील अल्पकालापुरतीच!

कारण कादंबरीचं सौंदर्य साधण्याचं कुशल मनोव्यापारदर्शन हें जसं एक प्रभावी हत्यार आहे, तसंच रचनेचा चमत्कार हेंहि आहे. अभ्यासू व उदयोन्मुख लेखकांना तर मी मुद्दाम असा सल्ला देईन कीं, त्यांनीं पहिल्यापेक्षां दुसरं कसब संपादण्याचा

अधिक प्रयत्न करावा. पुष्कळशा कादंबऱ्या व लघुकथा माझ्याकडे वाचून पाहायला म्हणून येतात. चित्तवेधकतेच्या दृष्टीनं त्यांचा दर्जा फार कमी असतो याचं मुख्य कारण हें कीं, त्यांत मनोवेधक घटनेचा अगर मांडणीचा भाग फार कमी असतो; आणि तो कमी असतो याचं कारण लेखकाजवळ कल्पकता नसते, अथवा अंगीं असलेल्या कल्पकतेला व्यायाम देण्याचा प्रयत्न त्यानं टाळलेला असतो. त्यानं कुठं तरी वाचलेलं असतं कीं, अंतर्यामींची कळकळ सगळ्यांत महत्त्वाची, तंत्रबिंत्र ही सारी वाग्यफळ बडबड ! हें वचन नव्या लेखकांना फार सोयीचं वाटतं. आपल्या अंगीं कल्पकता नाहीं याचा विषाद मानण्याऐवजीं तो अभिमान बाळगूं लागतो. 'अंतरींची तळमळ' नांवाचा जो पदार्थ तो अंगीं नसतांहि आहे असा स्वतःचा गैरसमज तो करून घेतो. आणि याचा परिणाम काय होतो ? तर कनिष्ठ प्रतीचं ललितवाङ्मय व उदयोन्मुख लेखकांची खुंटलेली प्रगति.

हें न व्हावं यासाठीं अभ्यासू लेखकाला मी कटाक्षानं सांगतों कीं लहान गोष्टींत काय किंवा कादंबरींत काय, कल्पकतेच्या बळावर लहानमोठे प्रसंग कसे निर्माण करावेत, व त्यांची गुंफण चतुराईनं कशी करावी याचा त्यांनीं मुद्दाम अभ्यास केला पाहिजे. मनोविश्लेषणाची हौस व शक्ति महत्त्वाची तर खरीच, परंतु तंत्रशुद्ध कथारचना म्हणजे देखील कष्टसाध्य कसब आहे. या दृष्टीनं कथारचनेच्या गुणावांचूनहि यशस्वी ठरलेल्या कादंबऱ्यांचं जसं मीं विवेचन केलं, तसंच केवळ रचनेची विस्मयकारक गम्मत साधण्याची हातोटी ज्यांच्या ठिकाणीं मला विशेष दिसते अशा लेखकांचाहि परिचय वाचकांना करून देणं मला कर्तव्य वाटतं.

Mrs. E. W. Savi ही या प्रकारच्या लेखकांपैकीं एक होय. 'वॉरिक डीपिंग'प्रमाणेंच हिच्या कादंबऱ्यांची संख्या फार

मोठी आहे. हिच्या सात-आठ कादंबऱ्या मी वाचल्या आहेत, व त्यावरून माझं असं मत झालेलं आहे, कीं इतर कोणतीहि ताकद मोठ्याशा प्रमाणांत या लेखिकेच्या अंगीं नसली तरी हिची कल्पकता प्रसंशनीय आहे, व कादंबरींत पेचप्रसंग निर्माण करण्याचं तंत्र या लेखिकेनं चांगलंच साध्य केलेलं आहे. या गोष्टी वाचकांच्या नीट लक्षांत याव्या म्हणून तिची एक कादंबरी मी उदाहरणादाखल घेतो. या कादंबरीचं नांव ‘Crashed’. (प्रकाशक: हचिन्सन.) हिचं कथानक प्रथम थोडक्यांत सांगतों म्हणजे त्याबद्दलची पुढची चर्चा वाचकांना सुगम वाटेल.

लंडनच्या नवकोटनारायण व्यापाऱ्यांत ‘रॉजर बेनब्रिज’ याची गणना प्रमुखपणें होत असे. याच्या व्यापारी उलाढाली फारच मोठ्या प्रमाणावर चालत असत, व याची महत्त्वाची कामगिरी पाहून वयाच्या चाळिसाव्या वर्षींच याला सरकारकडून ‘सर’ हा किताब मिळाला. लंडनच्या श्रीमंत प्रतिष्ठित समाजांत रॉजर बेनब्रिजला फार मोठ्या मानाचं स्थान असे. सरदार लोकसुद्धां त्याला आपल्या बरोबरीचा समजत असत. कारण रॉजर बेनब्रिजनं आपल्या हलक्या कुळाचं रहस्य मोठ्या शिताफीनं कायमचं गाडून टाकलं होतं. मूळचा तो ‘केंट’ परगण्यांतल्या एका साध्या गांवढळ शेतकऱ्याच्या कुळांत जन्मलेला. त्याचं खरं नाव ‘जेम्स टिप’. १९१४ सालच्या महायुद्धाच्या वेळीं तो लढाईवर गेला. मात्र तेथून जों तो परत आला तों आपल्या जन्मभूमीला न जातां लंडनला गेला. तो युद्धांत मेला असावा अशी सर्वांची समजूत असल्यामुळें कोणी त्याची चौकशी केली नाहीं; व उलट त्यानंहि आपल्या घरादाराची अगर नातलगांची पूसतपास केली नाहीं. त्याचा बाप व त्याची सावत्र आई आधींच मेलेली होती, व जे कोणी भाऊबंद उरले होते त्यांना जेम्स् टिप हा खरोखरीचा

मेला कीं जिवंत आहे याबद्दल कसून चौकशी करण्याचं कांहीं एक कारण नव्हतं. जेम्स् टिप लंडनला आला तो व्यापारांत नांव कमावण्याच्या महत्त्वाकांक्षेनं. या मार्गांत आपल्या पूर्वचरित्राची कदाचित् अडचण होईल म्हणून त्याचीं सारीं बंधनं तोडून टाकण्याचं त्यानं ठरविलं, व हें साधण्याचा उत्तम उपाय म्हणून 'रॉजर बेनब्रिज' या नांवानं तो वावरूं लागला. तो स्वभावतःच अतिशय कुशाग्र बुद्धीचा, उद्योगी अन् साहसी होता; आणि दैवानंहि त्याला अगदीं भरपूर हात दिला. थोड्याच काळांत रॉजर बेनब्रिज ही व्यापारी जगांतली एक मोठी आसामी झाली. वयाच्या ३४ व्या वर्षी त्यानं एका मोठ्या कुळांतल्या मुलीशीं लग्न केलं, व जेम्स् टिप आणि त्याचं चरित्र जगाच्या स्मृतिआड कायमचं गाडून टाकलं. रॉजर आणि त्याची पत्नी 'डेसीरे' म्हणजे लंडनच्या लक्ष्मीपुत्रांच्या निवडक समाजांतलं एक अग्रगण्य दांपत्य म्हणून मान्य झालं. कालांतरानं डेसीरेला एक मुलगाहि झाला. त्याचं नांव 'रोबिन.'

रॉजर बेनब्रिज यानं पैसा कमावला, कीर्ति मिळविली, परंतु एका मोठ्या सुखाला तो पारखा झाला होता. किंवा खरं सांगायचं म्हणजे त्या सुखाकडे त्याचं कधीं लक्षच गेलं नव्हतं. डेसीरेसारखी अत्यंत लावण्यवती स्त्री त्याला पत्नी म्हणून लाभली होती. तथापि तिचं प्रेम संपादण्याचा बुद्धिपुरस्सर प्रयत्न त्यानं कधींच केला नव्हता. त्याच्या घराची ती मालकीण होती. श्रीमंत समाजांत यजमानणीनं जीं कर्तव्यं करायचीं असतात तीं सारीं ती मोठ्या दक्षतेनं पार पाडीत असे. तिचे सारे ऐषआराम अगदीं पाण्यासारखा पैसा खर्च करून रॉजर बेनब्रिज चालवीत असे. येवढ्या गृहसौख्यापलीकडे अधिक कांहीं सुख आपल्याला हवं आहे अशी जाणीवच त्याला कधीं झाली नव्हती. तो रात्रं-दिवस लाखों रुपयांच्या उलाढाली करण्यांत निमग्न असे.

डेसीरे तिच्यासारख्या कोट्यधीशांच्या बायका ज्या तऱ्हेचे उद्योग करून आयुष्य घालवितात ते करण्यांत गुंतलेली असे. आतां तिच्या लग्नाला सहा वर्षं झालीं होतीं. परंतु लग्न झाल्यानंतर थोड्याच अवकाशांत तिनं ओळखलं होतं, कीं रॉजरच्या सहवासांत उत्कट प्रीतीचा अनुभव आपल्याला कधींच मिळणं शक्य नाहीं. त्याच्या अफाट संपत्तीची ती मालकीण होती. लंडन शहरीं व इतर ठिकाणीं मिळून डझनभर बंगले तिला राहायसाठीं होते. तिच्या तैनातीला हव्या तितक्या दासदासी होत्या. परंतु रॉजर एखाद्या लुब्ध प्रियकरा-प्रमाणें आपल्याशीं वागेल असं तिच्या स्वप्नांतहि तिला आणतां येत नव्हतं. स्त्री-प्रेमाची आसक्ति त्याच्या स्वभावांत बिलकुल नव्हती. त्याची संपत्ति हवी तशी तिनं वापरली तरी त्याची ना नव्हती, तिनं हवेतसे ऐषआराम केले तरी त्याची हरकत नव्हती, तिच्या इमानाबद्दल त्याला खात्री होती, व हवे ते उद्योग करण्याचं स्वातंत्र्य त्यानं तिला दिलेलं होतं. परंतु पुरुषानं परोपरीच्या चेष्टितांनीं व मुग्ध कृतींनीं आपला सतत अनुनय करावा ही जी स्त्रीसुलभ भूक ती रॉजरकडून कधीं भागवली जाईल अशी आशा आपण धरतां कामा नये हें ती केव्हांच उमजली होती. ती आपल्या मार्गानं जात होती. रॉजरचं प्रेम आपल्याला कधीं मिळेल याबद्दल कायमची निराशा तिनं पत्करली होती. रॉजर आपल्या भिन्न मार्गानं जात होता. डेसीरेचं प्रेम आपल्याला कधीं हवंसं वाटेल अशी त्याची कल्पना नव्हती.

परंतु संपत्तीच्या हव्यासाच्या दडपणाखालीं सुप्त राहिलेली ती इच्छा एके दिवशीं रॉजरच्या अंतःकरणांत एकदम तीव्रपणें जागृत झाली, आणि—

याच ठिकाणीं कादंबरींतला प्रारंभींचा नाट्यप्रसंग उत्पन्न झाला!

तो नाट्यप्रसंग असा कीं, पत्नीचं हृदय जिंकण्याचीं सुखस्वप्नं रचीत, व्यापाराच्या उलाढालींतून कायमचं निवृत्त होऊन सर्वस्वीं प्रेमांत दंग होऊन उरलेलं आयुष्य काढण्याचे विचार करीत सर रॉजर बेनब्रिज घरीं आला तों त्याची पत्नी घरीं नव्हती; पण ती लवकरच परत येईल व ती आली कीं आपल्याला 'सर' किताब मिळाल्याचं आपण तिला सांगूं, व आतां किती निराळ्या तऱ्हेनं आयुष्य घालविण्याचा आपण निश्चय केला आहे तेंहि तिला सांगून टाकूं, तें ऐकून तिला खचित आनंद होईल—इत्यादि विचार करीत तो तिची वाट पाहत राहिला. परंतु तितक्यांत जवळच्या टेबलावर एक उघडं पत्र पडलं होतं तिकडे त्याची दृष्टि गेली. त्यानं साहजिकच तें वाचून पाहिलं. डेसीरेच्या दासीनं तें लिहिलेलं होतं. त्यांत तिनं म्हटलं होतं कीं, 'मालकीणबाईनीं मला नोकरीवरून दूर केलेलं आहे. परंतु या घरांतून जाण्यापूर्वी आपल्याला जागृत करणं हें मी माझं कर्तव्य समजतें. आपली पत्नी कोणत्या नीतीची आहे तें सोबत पत्रांचं एक पुडकं ठेवलेलं आहे त्यावरून आपल्याला कळून येईल. हीं पत्रं आजच अचानक मालकीणबाईच्या खोलींत मला सापडलीं.'

तें पत्र वाचून रॉजर स्तंभितच झाला, व त्या पुडक्यांतलं एकेक पत्र जों जों तो वाचूं लागला तों तों विलक्षण संतापानं त्याचं अंतःकरण भरून गेलं. मिशेल नांवाच्या एका चित्रकाराकडे डेसीरे अलीकडे रोज जात असे हें त्याला माहीत होतं. परंतु त्याची इतकीच कल्पना होती कीं तो चित्रकार म्हणजे तिचा एक पूर्वीचा स्नेही होता, व त्याला जगापुढें यायची एक संधि द्यावी या हेतूनं ती स्वतःचं चित्र त्याच्याकडून काढून घेत होती. त्या चित्रकाराचा व डेसीरेचा कांहीं वावगा संबंध असेल

असं त्याच्या ध्यानींमनीं देखील नव्हतं. परंतु त्या पत्रांवरून निराळाच प्रकार उघड होत होता. डेसीरेनं स्वतः लिहिलेलं एकहि पत्र त्यांत नव्हतं हे खरं, परंतु मिशेलनं लिहिलेलीं तीं सारीं प्रेम-पत्रं तिनं ज्या अर्थीं जपून ठेवलीं होतीं त्या अर्थीं त्याच्या प्रेमाचा तिनं स्वीकार केला होता याबद्दल संशयाला जागा राहण्यासारखी नव्हती. मिशेलच्या लिहिण्यावरून डेसीरे सर्वस्वीं त्याची झाली होती हे अगदीं स्पष्ट होतं. अगदीं अखेरच्या पत्रांत तर तिला घेऊन पळून जाण्याच्या गोष्टी त्यानं स्वच्छ लिहिल्या होत्या.

अर्थात् आत्तां डेसीरे घरीं नव्हती यावरून ती मिशेलच्या स्टूडियोंतच असली पाहिजे असं रॉजरला वाटलं. म्हणजे काय दैवदुर्विपाक पाहा ! ज्या डेसीरेवर प्रेमाचा वर्षाव करण्याचा निश्चय करून तो घरीं आला होता ती व्यभिचारी, कुलटा असल्याचा भरभक्कम पुरावा त्याच्या हातीं अकस्मात् आला होता ! त्याला अतिशय दुःख झालं, अतिशय संतापहि आला. आतां डेसीरे घरीं परत आल्याबरोबर तिच्या दुर्वर्तनाचं माप तिच्या पदरांत घालून, तिची निर्भर्त्सना करून तिला हाकून देण्याचा त्यानं निश्चय केला.

या त्याच्या निश्चयाची डेसीरेला काय कल्पना असणार ! कारण ती मिशेलकडे गेली होती ती अगदींच निराळ्या हेतूनं. आपल्याविषयींच्या उत्कट प्रेमानं तो वेडा झाला आहे, व आपण त्याच्या सहवासांत अधिक राहिलों तर तो अविचारानं कांहीं तरी करील व आपल्यालाहि करायला लावील अशी भीति तिला वाटली होती. त्याचा अखेरचा निरोप घेण्यासाठीं व त्याला शुद्धीवर आणण्यासाठीं ती त्याच्याकडे गेली होती; व मिशेलच्या परोपरीच्या विनवणीनं यत्किंचितहि मृदु न होतां तिनं आपला हेतु पुरा केला होता. ती घरीं जायला परतली ती आतां तुझी

आणि माझी भेट कधींहि होतां कामा नये असं मिशेलला स्पष्ट बजावून व त्याच्याशीं कायमची ताटातूट करून!

ती घरीं आली तों ज्याची तिला कल्पनाहि नव्हती असा बिकट प्रसंग तिच्यासाठीं वाढून तयार होता. रॉजरनं तिच्यावर दुराचाराचा आरोप केला अन् तिला घरांतून बाहेर व्हायला सांगितलं. मिशेलच्या पत्रांचा पुरावा तिला कसा खोडून काढतां येणार! वस्तुतः ती निष्कलंक होती; परंतु त्या पत्रांत मिशेलनं काय वाटेल तें लिहिलं होतं, आणि तीं नाहींशीं करण्याऐवजीं जपून ठेवण्याचा मूर्खपणा तिनं केला होता. स्वतःचं शुद्ध चारित्र्य रॉजरला पटवून देण्याचं कोणतंच साधन तिच्या हातीं नव्हतं. आपल्या पतीनं आपल्या शब्दावर विश्वास ठेवूं नये याचा तिला मनस्वी संताप आला.

ती घराबाहेर पडली! तिची एक शाळेंतली जुनी मैत्रीण एका खेडेगांवीं रहात असे तिच्याकडे ती आपल्या रोबिन नांवाच्या लहानग्या मुलासह जाऊन राहिली.

धंद्यांतून निवृत्त होण्याचा आपला निश्चय रॉजरनं खरा केला. पत्नीचं प्रेम संपादन करण्याची इच्छा आयुष्यांत प्रथमच त्याला झाली होती, व लगेच त्या इच्छेवर जबरदस्त प्रहार झाला होता. त्यानं साहजिकच कल्पना केली कीं डेसीरे आपल्याला सोडून गेली ती मिशेलकडे गेली असली पाहिजे. त्याला स्वतःला आतां आयुष्यांत कोणत्याचं सुखाचं आकर्षण उरलं नव्हतं. त्यानं लंडन सोडलं व मन मानेल तसा प्रवास करायला प्रारंभ केला.

पॅरिस शहरांत त्याला अकस्मात् मिशेल भेटला. तो एकटाच होता. डेसीरे त्याच्याबरोबर नव्हती हें पाहून तो चकित झाला; आणि ज्या दिवशीं डेसीरेला त्यानं घराबाहेर घालविली त्या

दिवशींचा खरा वृत्तान्त जेव्हां मिशेलकडून त्याला कळला तेव्हां आपण केवढी भयंकर चूक केली तें त्याच्या लक्षांत आलं. त्याला मनस्वी पश्चात्ताप झाला. आतां डेसीरेची गाठ पुन्हा केव्हां पडेल व आपण तिची क्षमा केव्हां मागूं अशी त्याला घाई झाली. तो ताबडतोब लंडनला परत जाण्यासाठीं विमानानं निघाला.

पण वाटेंत अपघात होऊन हें विमान कोसळलं. रॉजर मरतां मरतां वाचला. परंतु अपघातांत त्याच्या मेंदूला जो भयंकर धक्का बसला त्याचा एक विलक्षणच परिणाम झाला. त्याला स्मृतिभ्रंश झाला, आणि तो भ्रंशहि असा चमत्कारिक कीं 'जेम्स टिप' या नांवानं जेवढं आयुष्य घालविलं होतं तेवढं त्याला स्पष्ट आठवत होतं, परंतु लंडनला येऊन त्यानं आपलं नांव बदललं त्यानंतरचा काळ मात्र त्याच्या स्मृतींतून पार गेला होता. अर्थात् हॉस्पिटलमध्यें जेव्हां तो शुद्धीवर आला तेव्हां 'जेम्स टिप' असं त्यानं आपलं नांव सांगितलं, व सुविख्यात कोट्याधीश सर रॉजर बेनाब्रिज हे अपघातांत मरण पावले असंच वृत्त साऱ्या इंग्लिश व फ्रेंच वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झालं. जेम्स टिपला केंट परगण्यांतल्या त्याच्या भाऊबंदांनीं घरीं नेलं. डेसीरे विधवा ठरली व रॉजरच्या मृत्युपत्राप्रमाणें त्याच्या अफाट संपत्तीची मालकीण झाली !

यानंतरचा कथाभाग मीं संक्षेपानं सांगितला तरी चालेल.

अपघातांत सापडून रॉजर मृत्युवश झाला हें पाहून डेसीरेला अतिशय दुःख झालं. आपण खरोखर निष्कलंक होतों ही गोष्ट आतां कधींच रॉजरला पटवून देतां येणार नाहीं ही कल्पना तिला अगदीं असह्य वाटूं लागली. तिच्या वांट्याला आलेल्या संपत्तीचा तिला एक प्रकारें तिटकारा आला. लंडन शहर तिला अगदीं नकोसं झालं. केंट परगण्यांतल्या एका खेड्यांत रॉजरनं पूर्वीच एक

लहानशी इस्टेट घेऊन टेवली होती; त्या शांत स्थलीं जाऊन राहायचं तिनं ठरविलं.

या ठिकाणीं जेम्स टिप व डेसीरे यांची योगायोगानं भेट झाली. रोबिनला व डेसीरेला प्रत्यक्ष पाहतांच रॉजरचा स्मृतिभ्रंश दूर झाला, व केवळ गैरसमजामुळें ज्यांची ताटातूट झाली अशा त्या पतिपत्नीचं पुनर्मीलन झाल.

" Crashed " या कादंबरीचं कथानक हें असं आहे. त्यांतल्या कित्येक हकीगती मीं या ठिकाणीं गाळून टाकल्या आहेत. विशेषतः मिशेलला कादंबरींतील खलपुरुष बनविण्यासाठीं जे लहान मोठे प्रसंग लेखिकेनं जुळवून आणले आहेत त्यांचा मीं येथें अजीबात संक्षेप केला आहे. याचं कारण एवढंच कीं या कादंबरींतल्या एकाच गुणाकडे मला वाचकांचं लक्ष वेधायचं आहे. तो गुण म्हणजे कथानकांत एकदम चित्तवेधक ठरतील असे नाट्यप्रसंग उत्पन्न करण्याचं लेखिकेचं कौशल्य. मिसेस सावी या लेखिकेचा कादंबरीच्या क्षेत्रांतील दर्जा फार मोठा मानायला मी मुळींच तयार नाहीं. तिच्या कादंबऱ्या वाचतांना आपण अगदीं पहिल्या प्रतीचं ललितवाङ्मय वाचीत आहोंत असा प्रत्यय मला केव्हांहि आलेला नाहीं. स्वभावरेखाटनांतील गम्मत, मनोव्यापारदर्शनाची बहार, सृष्टिवर्णनांची श्रीमंती, संवादांची खुमारी, अथवा मानवी जीवितासंबंधीं सखोल अभिप्राय, इत्यादि दृष्टींनीं या लेखिकेचं लिहिणं सामान्यच ठरेल. तिच्या कादंबऱ्या वाचतांना वाचकांनीं देखील असल्या अपेक्षा ठेवूंच नयेत. मात्र इतका खुलासा केल्यानंतर मला असं म्हटलंच पाहिजे कीं, वाचकाच्या मनाची तावडतोब पकड ज्यायोगें घेतली जाईल असे नाट्यप्रसंग निर्माण करण्याचं या लेखिकेचं चातुर्य मला अगदीं लक्षांत ठेवण्यासारखं वाटतं. तिच्या सात-आठ

कादंबऱ्या मीं वाचल्या आहेत, व त्यांपैकीं प्रत्येकीचा प्रारंभ मला विलक्षण चमत्कृतिपूर्ण वाटलेला आहे.

उदाहरणार्थ, "On Trust" या कादंबरीचा प्रारंभ पाहा. इंग्लंडहून आलेली बोट हिंदुस्थानाच्या बंदरांत शिरत आहे. आपल्या प्रियजनांना व मित्रांना सामोरे आलेले लोक बंदराच्या धक्क्यावर गर्दी करून उभे आहेत, व उत्सुकतेनं त्यांची मोठी धांदल उडालेली आहे. बोटीवरचे उतारू देखील अधीरतेनं डेकवर जमा झालेले आहेत. बंदरावर जमलेल्या माणसांत आपलं प्रिय माणूस कुठं आहे तें शोधण्यांत प्रत्येकाची नजर गुंतलेली आहे. बोट किनाऱ्याला केव्हां लागते व आपण केव्हां एकदां खालीं जातों अशा विचारानं अधीर झालेल्या त्या प्रवाशांच्या घोळक्यांत एक देखणी तरुणी आहे. तिचं नांव "हिलॅरी." तिच्या अंतःकरणांत या क्षणीं उचंबळणाऱ्या आनंदाचं वर्णन करणं कठीण आहे. कारण ती आपल्या प्रियकराशीं विवाहबद्ध होण्यासाठीं इंग्लंडहून आलेली आहे. तिच्या प्रियकराचं नांव "ओवेन."

दोघांचं प्रेम थोड्या वर्षांपूर्वी जमलं होतं; परंतु त्या वेळीं विवाह करण्याइतकी ओवेनची सांपत्तिक स्थिति चांगली नव्हती. पण यापुढें त्याला कलकत्त्याच्या एका व्यापारी कंपनींत नोकरी लागली होती, व त्याचा बऱ्यापैकीं जम बसल्यावर आतां पांच वर्षांनीं त्यानं लग्न करायचं ठरविलं होतं. त्यानं हिलॅरीला लिहिलं होतं, ये, आणि प्रवासखर्चाचे पैसे तिला पाठवून दिले होते.

तेव्हां बोटीवरची हिलॅरी किती हर्षभरित मनस्थितींत असेल त्याची कल्पना करा. आपल्या प्रियकराच्या बोलावण्याची तिनं पांच वर्षे निष्ठेनं व आशेनं वाट पाहिली होती. आतां लवकरच तिचं सुखस्वप्न खरं होणार होतं! अशी ही हिलॅरी एकीकडे

प्रवासांत ओळखीच्या झालेल्या माणसांचा निरोप घेत आहे व एकीकडे तिची दृष्टि धक्क्यावर जमलेल्या गर्दींत ओवेन कुठं दिसतो कां तें शोधीत आहे. तिनं पुष्कळ निरखून पाहिलं तरी तिला ओवेनची मूर्ति दिसत नाहीं, तेव्हां तिचं अंतःकरण व्यथित होतं, व शेजारच्या माणसाशीं चाललेल्या संभाषणांत तिचं चित्त राहणं कठीण होतं!

बोट धक्क्याला लागतांच उतारू भरारा खालीं जातात. हिलॅरीचीं पावलं जड होतात. तिचा ओवेन तिचं स्वागत करायला आला नव्हता. तिनं कसं उतरायचं? कुठं जायचं?

इतक्यांत एक मनुष्य बोटीवर चढून येतो. तो तिच्या जवळ येऊन म्हणतो, " हिलॅरी सिंक्लेअर तुम्हीच काय? ओवेनला येतां आलं नाहीं. त्यानं हें पत्र तुम्हांला दिलं आहे."

पत्र! हिलॅरीचं अंतःकरण चरकल्यावांचून राहत नाहीं. हें लक्षण कांहीं ठीक नाहीं असं तिला मनांतल्या मनांत वाटतं! आणि तें पत्र फोडून वाचल्यावर तिची ती शंका खरी ठरते. कारण ओवेननं त्या पत्रांत लिहिलेलं असतं, " मिसेस् ब्रॅगेन नांवाच्या एका स्त्रीचा व माझा संबंध होता. तिच्या नवऱ्यानं घटस्फोटाची फिर्याद केलेली आहे. माझ्या नोकरीलाहि मला मुकावं लागलेलं आहे. अशा स्थितींत मी तुझ्याशीं लग्न कसं करूं? तूं आलीस त्याप्रमाणें परत जावंस हें उत्तम. तुझ्या परत-प्रवासाची सारी सोय मी करीन."

हिलॅरीला केवढा धक्का बसला असेल, व या विचित्र परिस्थितींतून तिनं मार्ग कसा काढला असेल?

हे प्रश्न वाचकांच्या मनांत उभे राहिलेच पाहिजेत. "On Trust" ही कादंबरी म्हणजे या प्रश्नांचं उत्तर आहे. या कादंबरीचं समग्र कथानक येथें देण्याचं कारण नाहीं. कादंबरीच्या

पहिल्याच प्रकरणांत वाचकाची जिज्ञासा जोरानं डवचण्यासाठीं अत्यंत चमत्कृतिपूर्ण नाट्यप्रसंग योजण्याची कल्पकता मिसेस् सावी या लेखिकेनं कशी साध्य केली आहे तें वाचकांना पटविण्यासाठींच केवळ 'On Trust' या कादंबरीचा प्रारंभ मीं थोडक्यांत सांगितला.

तिची ही कल्पकता "Crashed" या कादंबरींत फार मोठ्या प्रमाणांत दिसून येते. कारण या कादंबरीच्या प्रारंभांत जी घटना तिनं योजिलेली आहे तींत मानसशास्त्राचा गमतीचा खेळ तिनं गुंतविला आहे. जो धनाढ्य रॉजर बेनब्रिज वर्षानुवर्षे केवळ आपल्या व्यापारांत व द्रव्यसंचयाच्या हव्यासांत गुंतून राहिला त्यानं आपल्या पत्नीचं खरं प्रेम संपादन करण्याचा निश्चय करावा, व नेमका त्याच वेळीं तिच्या व्यभिचाराचा पुरावा त्याच्या हातीं पडावा ही किती विलक्षण घटना! आणि ही अकल्पितपणें घडल्यानंतर त्याच्या प्रेमोत्सुक मनाची झालेली अवस्था किती विलक्षण! त्याचप्रमाणें डेसीरेनं मिशेलची कानउघाडणी करून आपलं कदाचित् चुकणारं पाऊल उजूं करावं, आणि लगेच तिच्यावर तिच्या पतीनं व्यभिचाराचा आरोप करावा, व आपली निष्कलंकता सिद्ध करण्यास ती सर्वस्वीं असमर्थ असावी, ही घटना तरी किती चमत्कारिक! व या परिस्थितीनं झालेली त्या सच्छील पत्नीच्या मनाची अवस्था किती केविलवाणी!

मुख्य पात्रांच्या बाह्य परिस्थितींत व अंतरंगांत येवढा विलक्षण स्फोट प्रारंभींच् उडवून दिला, कीं कादंबरीचं अर्धे अधिक यश निश्चित असतं हें या लेखिकेनं पुरतं ओळखलेलं आहे. तिची Crashed ही कादंबरी किंवा इतर कादंबऱ्या वाचल्यानं वाचकांचा इतर कोणताहि फायदा झाला नाहीं, तरी नाट्यप्रसंग निर्माण करण्याची तिची हातोटी, व जिज्ञासा-प्रक्षोभक प्रारंभ करण्याची

तिची कल्पना त्यांना पुष्कळ अनुकरणीय वाटेल अशी माझी खात्री आहे. विशेषतः नवीन लेखकांच्या ठिकाणीं स्वतःची कल्पकता वाढविण्याविषयीं जी उदासीनता मला दिसते ती ललित साहित्याच्या विपुलतेच्या व विविधतेच्या दृष्टींनं मला चिंताजनक वाटत असल्यामुळें मी अभ्यासू लेखकांना मुद्दाम कटाक्षानं सांगतों, कीं चित्तवेधक प्रसंगाची निर्मिति हें एक मोठं प्रभावी हत्यार आहे, व तें कसं वापरावं याचा एखादा नमुना पाहायचा असेल तर त्यांनीं Crashed या कादंबरीच्या कथानकाचा नीट अभ्यास करावा.

---

## ७ : : प्रीतिदाह

रहस्यमय कादंबरी म्हटली कीं ती एक ऐतिहासिक कादंबरी तरी असावी, किंवा गुप्त पोलीसाच्या चातुर्यांची तरी कथा असावी, असं वाचक सामान्यतः समजतात. परंतु ही समजूत चुकीची आहे. कारण रहस्यमय घटनेचा संभव फक्त शिवाजी, संभाजीच्याच कालांत असून आपल्या आजच्या आधुनिक सामाजिक जीवनांत रहस्याला बिलकुल अवकाश नाहीं असं थोडंच म्हणतां येईल? किंवा खून घडला, चोरी झाली व गुप्त पोलीस गुन्हेगारांना शोधायला लागले म्हणजेच काय ती रहस्यमय कथा निर्माण होईल असं तरी कसं म्हणतां येईल? आधुनिक समाजाचं चित्र काढणाऱ्या कादंबरींतहि रहस्याला भरपूर जागा असूं शकेल; व हें रहस्य खून, मारामारी किंवा चोरी अशा उत्तान स्वरूपाचं नसूनहि चित्तवेधकतेच्या दृष्टीनं एका सुंदर सामाजिक कादंबरीचा विषय होण्याच्या योग्यतेचं तें ठरूं शकेल. किंबहुना सामाजिक कादंबऱ्या लिहिणाऱ्या इंग्रज लेखकांपैकीं कांहीं असे आहेत कीं ते आपल्या कथानकांत एखादं रहस्य ठेवण्याचा विशेष प्रयत्न करतात, व त्याच्या जोरावरच वाचकांची जिज्ञासा खेळवितात.

अशा लेखकांपैकीं 'सेसिल रॉबर्ट्स' मला विशेष आवडतो.

याच्या ज्या कादंबऱ्या मीं वाचल्या त्यांतल्या तीन नमुनेदार म्हणून मी निवडीन : एक 'लव्ह रॅक,' दुसरी 'सेल्स ऑफ सनूसेट' आणि तिसरी 'हॅव्हॅना बाउंड.' या तिन्ही कादंबऱ्यांत कांहीं तरी रहस्य खेळविण्याची युक्ति तर त्यानं वापरली आहेच; तथापि याखेरीज आणखी एक कसब त्यानं केलं आहे. प्रत्येक कादंबरींत आधुनिक, सामाजिक जीवनाभोंवतीं अद्‌भुतरम्य वातावरण त्यानं निर्माण केलं आहे. ठराविक साच्याच्या सुंदर अथवा उच्चवर्गीय प्रेमिकांच्या गोष्टी वाचून ज्याप्रमाणें वाचक विटतो, त्याप्रमाणें ठराविक वातावरणाचाहि वाचकाला कंटाळा येतो. लंडन शहरामधलं वातावरण, किंवा ससेक्स परगण्यांतलं वातावरण अनेक कादंबऱ्यांत वाचल्यावर वाचकाला अपरिचित अशा वातावरणाची इच्छा साहजिकच होऊं लागते, व ही इच्छा तृप्त करणारी कादंबरी त्याला आढळली कीं तो तिच्याकडे चटकन् आकृष्ट होतो. अशा अपरिचित व त्यामुळें कांहींशा अद्‌भुतरम्य वांटणाऱ्या वातावरणाचा शोध करणारे इंग्रज लेखक बहुतेक इटली-कडे वळतात असं मला दिसून आलं आहे. इतरहि कांहीं स्थळं ते निवडतात; परंतु इटलीचा मोह सगळ्यांत जास्त. "हेस्टर व तिचं कुटुंब" या कादंबरीचा उत्तरार्धहि तिच्या लेखकानं इटलींत घडविला आहे हें वाचकांना स्मरत असेलच. त्या कादंबरीच्या आकर्षणाचं तें एक लहानसं कारण आहे. सेसिल रॉबर्ट्स याच्या 'सेल्स ऑफ सनूसेट' व 'लव्ह रॅक' या दोन्ही कादंबऱ्या इटालियन पार्श्वभूमीवर आधारलेल्या आहेत; व वातावरणाच्या रम्यतेच्या भरीला लेखकानं या दोन्ही कादंबऱ्यांत रहस्याची योजना केलेली आहे.

रहस्यमय कथानक लिहिण्याचं जें एक विशिष्ट तंत्र आहे त्याचा अभ्यास नव्या लेखकांना बराच उपयुक्त होईल अशी माझी

समजूत आहे. स्वभाव-दिग्दर्शनात्मक ( Novels of character ), मनोविश्लेषणात्मक ( Psychological novels ), घटनात्मक ( Novels of incidents ) इत्यादि कादंबऱ्यांचे प्रकार ज्याप्रमाणें मानतां येतील त्याप्रमाणेंच रहस्यात्मक सामाजिक कादंबऱ्यांचा एक स्वतंत्र प्रकार समजावा लागेल. कथारचनेचं कौशल्य असं ज्याचं आपण सामान्यपणें वर्णन करतों तें अवगत असलं कीं रहस्यात्मक कादंबरी सहज लिहितां येईल अशी समजूत होण्याचा संभव आहे; परंतु ही समजूत चुकीची म्हणावी लागेल. कारण गुंतागुंत, निरगाठ, उत्कर्षबिंदु इत्यादि टप्प्यांनीं जें कथानक कादंबरींत सांगायचं त्याची रचना करणं निराळं, आणि एखाद्या रहस्याच्या साहाय्यानं वाचकांची उत्कंठा प्रारंभापासून अखेरपर्यंत आपल्या ताब्यांत ठेवणं निराळं. या दोन गोष्टींतला भेद वाचकांना स्पष्ट समजावा म्हणून सेसिल रॉबर्ट्सची 'लव्ह रॅक' ही कादंबरी आपण उदाहरणादाखल घेऊं, व तिच्या लेखनांत त्यानं कोणतं तंत्र संभाळलं आहे तें पाहण्याचा प्रयत्न करूं. यासाठीं तिचं कथानक मला अर्थातच आधीं सांगितलं पाहिजे.

'सर जॉन चेन' या नांवाचे सुमारें अठ्ठेचाळीस वर्षांचे एक इंग्रज गृहस्थ सैन्यांतल्या मोठ्या अधिकाराच्या जागीं होते. त्यांचं घराणं मोठं नामांकित व नोकरींतला हुद्दा फार मोठा. परंतु एवढ्या गोष्टी वगळल्या तर त्यांच्या अंगीं गुण फार थोडे होते. शरीरानें ते जाडजूड आणि कांहींसे स्थूल होते; वृत्तीनं बरेचसे अहंमन्य व तापट; सैन्याच्या कामाखेरीज इतर गोष्टींत त्यांच्या बुद्धीची गति यथातथाच होती; व रसिकतेच्या नांवानं तर ते शून्यच होते. तथापि, त्यांना बायको मिळाली ती अत्यंत सुंदर आणि अवघ्या एकोणीस वर्षांची. लग्नामुळें ही रसिक, स्वरूपवति पोरसवदा तरुणी एकदम 'लेडी चेन' झाली. सर जॉन चेन

हे हिंदुस्थानच्या सरहद्दीवरील एका लष्करी ठाण्यावर अधिकारी होते. लेडी चेन अर्थातच त्यांच्याबरोबर तिकडे गेली; परंतु नंतर थोड्याच अवधींत सर जॉन यांच्या स्वभावाला व लष्करी ठाण्यावरच्या एकाकी रूक्ष जीवनाला ती कंटाळली. नवरा-बायकोचं पटेनासं झालं, व लेडी चेन इंग्लंडमध्यें जाऊन राहण्यासाठीं हिंदुस्थानाहून निघाली.

वाटेंत आगबोटीवर तिची व 'जॉफ्रे पोवे' याची गाठ पडली. हीं दोघं लहानपणीं एकत्र वाढलेलीं होतीं, त्यामुळें आगबोटीवर दोघांचा निकट सहवास घडला, व इंग्लंडला आल्यावर तो आणखी वाढला. बाळपणाच्या मैत्रीचं प्रेमांत रूपांतर झालं आणि सर जॉन चेनला कंटाळलेल्या लेडी चेनला विवेक उरला नाहीं; किंबहुना तो ठेवावासा तिला वाटलं नाहीं. सर जॉन चेनपासून घटस्फोट घेऊन जॉफ्रेशीं लग्न करायचं तिनं ठरविलं. जॉफ्रेपासून आपल्याला गर्भ राहिला हें समजून येतांच तिनं सर जॉन यांना सारी हकीगत स्पष्ट सांगणारं एक पत्र लिहिलं. परंतु दुर्दैवानं त्याच दिवशीं तिला एक भयंकर शोककारक बातमी कळली. जॉफ्रे पोवे शिकारीला गेला असतांना मरण पावला. सुखाच्या स्वर्गांत पाऊल टाकतां येणार म्हणून अत्यानंदांत असलेली लेडी चेन एकदम खालीं दुःखाच्या गर्तेत फेकली गेली !

सर जॉन यांनीं लेडी चेनवर घटस्फोटाची फिर्याद केली. अशा फिर्यादींत विवाहित स्त्रीशीं ज्यानं व्यभिचार केला असेल तोहि प्रतिवादी ठरतो, परंतु त्याचं नांव माहीत असेल तर. लेडी चेननं जॉफ्रेचं नांव सांगायचं अजीबात नाकारलं. जॉफ्रेची वृद्ध आई हयात होती, व तिला आपल्या पुत्राविषयीं अपरिमित आदर होता. त्या वृद्ध मातेच्या आदरयुक्त भावना दुखविल्या जाऊं नयेत म्हणून लेडी चेननं जॉफ्रेचं नांव गुप्त ठेविलं. कोर्टांतली केस तिनं

लढविली नाहीं. सर जॉन यांच्यासारखा निकाल झाला. लेडी चेन इंग्लंड सोडून नाहींशी झाली. ती कुठें गेली याची कुणालाहि कल्पना नव्हती. तिचा सॉलिसिटर शॅंडबर्न यालासुद्धा! लेडी चेनच्या हातून जो प्रमाद घडला त्याविषयीं शॅंडबर्नला सहानुभूति होती. ज्या धैर्यानं तिनं घटस्फोटाच्या प्रसंगाला तोंड दिलं तें पाहून तिच्याविषयीं त्याच्या मनांत आदर उत्पन्न झाला होता, व ज्या दृढनिश्चयानं तिनं आपल्या प्रियकराचं नांव गुप्त ठेवून त्याचं संरक्षण केलं तो तर त्याच्या दृष्टीनं असामान्य होता. तिच्या पोटीं येणारं मूल बेवारशी ठरेल याबद्दल त्याला अनुकंपा वाटली व लेडी चेनशीं आपण लग्न करून तिला व तिच्या अपत्याला संकटमुक्त करावं अशी देखील कल्पना त्याच्या डोक्यांत आली. पण आपण लेडी चेनचे सॉलिसिटर आहोंत अशा विवेकाचा संयम त्यानं केला. ती इंग्लंडमध्यें राहिली असती तर त्यानं तिचं प्रियाराधन नंतर कदाचित केलंहि असतं; परंतु ती गेली ती अजीबात नाहींशी झाली !

घटस्फोटानंतर सर जॉन यांनीं लवकरच दुसरा विवाह केला. त्यांच्या दुसऱ्या पत्नीला मुलगी झाली; तिचं नांव क्लेअर.

यापुढें वीस वर्षांनंतरची गोष्ट.

क्लेअर आतां तारुण्याच्या ऐन भरांत आलेली होती. स्वरूपानं तर ती असामान्यच होतीच, परंतु बुद्धीच्या कुशाग्रतेच्या दृष्टीनं व रसिकतेच्या दृष्टीनं देखील तिची असामान्यता कुणीहि कबूल करावी अशी होती. या गुणांच्या जोडीला तिच्या ठिकाणीं आणखी एक गुण होता. मात्र सर जॉन यांना तो गुणासारखा वाटत नसे. उलट त्यायोगें तिच्याविषयीं ते मनांतल्या मनांत चिंताग्रस्त असत, व त्यांना तिची एक प्रकारची गुप्त भीति देखील वाटे. हा गुण म्हणजे क्लेअरचा पराकाष्ठेचा स्वतंत्र बाणा. तिला संगीताची विलक्षण आवड होती, आणि त्याप्रमाणेंच प्रवासाचीहि.

सर जॉन यांच्या श्रीमंतीमुळें तिचे हे दोन्ही षोक पूर्ण होत असत. आपल्या आईबापांबरोबर क्लेअरनं किती तरी प्रवास केला.

एकदां प्रवास करतां करतां हें कुटुंब जिनीव्हा शहरीं असतांना तेथें एका नव्या उदयोन्मुख तरुण व्हायोलिनकाराचा मोठा जलसा झाला. या तरुणाचं नांव 'गाय फोवे'. हा तरुण खरोखरच एक असामान्य कलावन्त होता, व अल्पावकाशांतच तो दिगंत कीर्ति मिळवील असं तज्ञांचं भाकित होतं. त्याच्या वादनकौशल्याला क्लेअर पराकाष्ठेची मोहित झाली. जलशाच्या दुसऱ्या दिवशीं क्लेअर व तिचे आईबाप जिनीव्हा सोडून परत इंग्लंडला जाणार होते. परंतु त्या दिवशीं कर्मधर्मसंयोगानं शहरांतून क्लेअर एकटीच फिरत असतांना तिची व 'गाय फोवे'ची गाठ पडली. त्या गाठींत दोघांचं संभाषण इतकं थोडं झालं कीं क्लेअरचं नांवसुद्धां 'गाय'ला कळलं नाहीं. तथापि दोघंहि एकमेकांवर अनुरक्त झालीं!

हा 'गाय फोवे' कोण होता ? तर—

लेडी चेनच्या पोटीं आलेला तो मुलगा!

लेडी चेन घटस्फोटानंतर मायदेशाचा कायमचा त्याग करून जी निघाली ती इटली देशांत येऊन जिनोआपासून अठरा मैलांवर असलेल्या रॅपोलो नांवाच्या एका लहानशा बंदराच्या गांवीं येऊन राहिली होती. " मादाम फोवे " असं फ्रेंच नांव तिनं धारण केलं होतं, व आपला पति फ्रेंच सैन्यांत एक अधिकारी होता अशी कथा तिनं रचली होती. तिचा मुलगा 'गाय' अर्थात् अशाच समजुतीवर वाढला कीं आपली आई इंग्लिश असून आपला बाप फ्रेंच होता. प्रकृतीच्या सबबीवर मादाम फोवे आपला किल्ल्यासारखा बंगला सोडून कधींहि कुठें बाहेर पडत नसे. तिचा मुलगा 'गाय' म्हणजेच तिचं सारं जग होतं, व त्याच्यावर तिनं पराकाष्ठेचं प्रेम केलं. त्याला एका अत्यंत

नामांकित शाळेंत तिनं पाठविलं, व पुढें त्याला संगीताची आवड आहे असं दिसून येतांच त्याला कलावन्त करण्यासाठीं तिनं पाण्यासारखा पैसा खर्च केला. गायची आपल्या आईवर जी ममता व भक्ति होती तिला खरोखर कसली सीमा नव्हती. जगांत जें जें म्हणून सुंदर, पवित्र, आदरणीय असेल तें तें आपल्या आईच्या ठिकाणीं साठलेलं आहे अशा भावनेनं तो तिच्याशीं वागे. आणि आतां आपल्या साऱ्या श्रमांचं सार्थक होऊन आपला 'गाय' कीर्तीच्या मार्गावर चालूं लागलेला पाहून मादाम फोवे हर्षभरित झाली असल्यास नवल कसलं ! मात्र या साऱ्या आनंदाचा विरस करणारी एक दुष्ट चिंता तिला सतत वाहवी लागत होती. 'गाय'चं जन्मरहस्य तिनं आज बावीस वर्षं गुप्त ठेविलं होतं खरं; पण तिच्या मनांत राहून राहून येई कीं केव्हां तरी तें रहस्य 'गाय'ला सांगावं लागणारच. आणि तें सांगितल्यावर कोणते भयंकर परिणाम होतील !... 'गाय' जसजसा यौवनाच्या मार्गानं पुढें पुढें जाऊं लागला होता तसतशी तिची ही चिंता अहर्निश वाढत गेली होती !

जिनीव्हा शहरीं 'गाय'चा जो जलसा झाला तो इतका यशस्वी ठरला कीं एका नामांकित वृद्ध कलावन्तानं त्याच्या जलशांचं कॉन्ट्रॅक्ट घेतलं. ठिकठिकाणीं जलसे करतां करतां गाय इंग्लंडला पोंचला. इंग्लंडला जाण्यांत 'गाय'ला विशेष आनंद होत होता तो या कल्पनेनं कीं ज्या मुलीचं नांवहि त्याला माहीत नव्हतं पण जिच्यावर त्याचं दृढ प्रेम बसलं होतं, व पहिल्या भेटीपासून सतत जिचं तो चिंतन करीत होता ती त्याला इंग्लंडमध्यें भेटेल असं त्याला वाटत होतं. लंडनमध्यें त्याचा पहिला जाहीर जलसा झाला तेव्हां तो सुरू होण्यापूर्वी त्याच्या मनाची चिंता एकच; आपला जलसा ऐकायला 'ती' आली असेल !

होय, क्लेअर आली होती. 'गाय' ज्याप्रमाणें तिला विसरला नव्हता त्याप्रमाणें तिलाहि त्याचा घ्यास लागलेला होता. त्याच्या आगमनाकडे ती अगदीं भुकेल्या अंतःकरणानं डोळे लावून बसली होती.

'गाय'च्या इंग्लंडमधलि सफरींत तो व क्लेअर पुष्कळच एकत्र आलीं. 'व्हर्नूले आडनांवाची मंडळी चेन कुटुंबाच्या स्नेह्यांपैकीं होती. या मंडळींनीं आपल्या इस्टेटीवर दोन दिवस मजेनें राहाण्यासाठीं 'गाय'ला आमंत्रण दिलं. येथें क्लेअरहि आली. तिचा व 'गाय'चा दोन-चारच दिवस परंतु अत्यंत निकट सहवास झाला. नंतरच्या दिवसांत त्यांचं दोघांचं प्रेम वाढत गेलं व अखेर दोघांनीं विवाहाचा निश्चय केला. क्लेअरला मनांतल्या मनांत वडिलांची भीति वाटत होती. त्यांचीं मतं किती जुनाट आहेत, व आपण एका कलावन्ताशीं लग्न करणार म्हणतांच ते किती अकांड-तांडव करतील याची तिला कल्पना होती. परंतु 'गाय'नं तिचं अंतःकरण सर्वस्वीं जिंकलं होतं व त्याच्यासाठीं येतील तीं संकटं सोसायला ती तयार होती. 'गाय'नं आपलं प्रेम सर जॉन यांच्या लेकीवर जडलं आहे ही गोष्ट आपल्या आईपासून गुप्त ठेवली. आपल्या आईची आपल्यावर इतकी ममता आहे कीं तींत कुणी नवीन भागीदार होणार ही कल्पनासुद्धां तिला सहन होणार नाहीं हें त्याला कळत होतं. आणि शिवाय त्यानं विचार केला कीं ज्या क्लेअरवर तो अनुरक्त झाला होता तिचं लावण्य व तिचे गुण इतके असामान्य होते कीं तिला प्रत्यक्ष पाहिल्यावर आपली आई विवाहाला ताबडतोब सम्मति देईल. अशा रीतीनं 'गाय' व क्लेअर या दोघांनाहि विवाहाच्या मार्गांत अडचणी दिसत असल्या तरी त्या आपण सहज दूर करूं अशा आशेंत तीं दोघंहि होतीं. आपल्या

मार्गातील खऱ्या संकटाची यत्किंचित् देखील कल्पना त्यांना नव्हती !

परंतु हें त्यांचं अज्ञान किती काळ टिकणार? जें रहस्य 'गाय'-ला अथवा क्लेअरला माहीत नव्हतं तें दोघांनाहि कसं कळलं व तें कळूनहि दोघंहि आपल्या परस्परप्रीतीशीं कशीं एकानिष्ठ राहिलीं इत्यादि कथाभाग मी विस्तारानं सांगत नाहीं. या कादंबरीची चर्चा करण्यांत माझा मुख्य हेतु एकच आहे. ही रहस्यात्मक कादंबरी लिहितांना कथानिवेदनाचं कोणतं तंत्र सेसिल रॉबर्ट्स यानं वापरलेलं आहे तें मला वाचकांना सांगायचं आहे.

रहस्यात्मक सामाजिक कादंबरी लिहितांना लेखकानं मुख्य तंत्र संभाळायचं असतं तें हें कीं, कादंबरीच्या प्रारंभापासूनच वाचकांना त्यानं असं वाटायला लावलं पाहिजे कीं मुख्य पात्रांच्या सुखदुःखांवर विलक्षण परिणाम करणारं असं कांहीं तरी रहस्य आहे; आणि हें रहस्य इतक्या सावकाश त्यानं उलगडीत नेलं पाहिजे कीं, वाचकांची उत्कंठा अखेरपर्यंत ताणलेली राहिली पाहिजे. सेसिल रॉबर्ट्स यानं या दोन्ही गोष्टी मोठ्या कसबानं साधलेल्या आहेत.

कथानकाचा एकंदर आराखडा मीं वाचकांपुढें मांडलेलाच आहे. तो लक्षांत घेऊन वाचकांनीं आपापल्या मनाशीं विचार करावा, समजा आपल्याला ही कादंबरी लिहायची असली तर तिचा प्रारंभ आपण कुठें करूं? सर जॉनचं पहिलं लग्न झालं त्या ठिकाणीं? कीं लेडी चेन व जॉफ्रे यांची आगबोटीवर गांठ पडली त्या ठिकाणीं? कीं जॉफ्रे अकस्मात् मेला त्या ठिकाणीं, कीं लेडी चेन इटलीला येऊन मादाम फोवे या नांवानं राहूं लागली त्या ठिकाणीं?

यांपैकीं एकहि प्रारंभ तंत्रदृष्ट्या सोयीचा कां नाहीं तें वाचकांनीं नीट समजून घ्यावं. रहस्यात्मक, सामाजिक कादंबरी

लिहिण्यांतलं एक मर्म असं आहे कीं, कादंबरीच्या प्रारंभीं व नंतरच्या बऱ्याचशा भागांत कथानकाला प्राणभूत असलेलं रहस्य ज्याप्रमाणें कादंबरींतल्या मुख्य पात्रांना अज्ञात असावं लागतं त्याप्रमाणेंच तें वाचकांपासूनहि लपवून ठेविलं पाहिजे. आणि नंतर मात्र एकीकडे त्या पात्रांना अज्ञानांतच ठेवून वाचकांना तेवढं हलके हलके आपल्या मसलतींत लेखकानं घेतलं पाहिजे. हें तंत्र संभाळलं म्हणजे काय परिणाम होतो तें पाहा. वाचकाला सतत उत्कंठा वाटत जातें हें तर झालं. परंतु त्या उत्कंठेच्या दोन अवस्था होतात. प्रारंभीं वाचकाला जी उत्कंठा वाटते ती 'ही आहे तरी काय भानगड' अशा प्रश्नाच्या स्वरूपाची असते. लेखक जेव्हां रहस्याचा उलगडा वाचकापुरता करतो तेव्हां त्याच्या उत्कंठेची ही अवस्था संपते. पण लगेच दुसऱ्या स्वरूपाची उत्कंठा निर्माण होते. कारण वाचक मनाशीं म्हणूं लागतो, जें रहस्य मला माहीत झालं तें कादंबरींतल्या मुख्य पात्रांना जेव्हां माहीत होईल तेव्हां तीं काय करतील, कशी वागतील, पेचप्रसंग कसा सोडवतील, कथानकाचा शेवट दुःखांत होईल कीं सुखांत ?

हें तत्वविषयक विवेचन लक्षांत ठेवून वाचकांनीं पुन्हा आपल्या मनाशीं विचार करावा, कीं सेसिल रॉबर्ट्स यानं या कादंबरीचा प्रारंभ कथानकाच्या सांखळींतल्या कुठल्या दुव्यापासून केला असेल ? आणि वाचकांनीं आपापलीं उत्तरं मी जें सांगतों त्यांच्याशीं ताडून पाहावीं. ज्यांचीं उत्तरं बरोबर येतील ते एका महत्त्वाच्या चाचणींत पास झाले असं समजायला हरकत नाहीं.

जिनीव्हा शहरीं 'गाय'चा जो पहिला जाहीर जलसा झाला व ज्या जलशाला क्लेअर आपल्या आईबापासह हजर राहिली त्या जलशानंतरच्या दुसऱ्या दिवसापासून कथानकाचं सूत्र सेसिल रॉबर्ट्सनं हातीं घेतलं आहे. कादंबरीच्या पहिल्या प्रकरणांत या

जलशाची हकीगत सूचित केलेली आहे व गाय आणि क्लेअर यांची अकल्पितपणें भेट घडवलेली आहे.

या दोघांची गाठ पडतांच वाचक तावडतोब ओळखतो कीं, कादंबरींत यांच्या प्रेमाची कथा आहे. मात्र यापलीकडे अधिक कसलीच कल्पना वाचकाला करतां येत नाहीं, व नंतरच्या प्रकरणांत गाय जेव्हां आपलं एका मुलीवर प्रेम बसल्याचं आपल्या आईजवळ निष्कपट अंतःकरणानं उघड करतो त्या वेळची तिची चमत्कारिक प्रतिक्रिया पाहून वाचकाला विस्मयाचा पहिला लहानसा धक्का बसतो. त्याच्या मनांत येतं, 'गाय'च्या आईचं कांहीं तरी गुप्त रहस्य आहे. त्याची जिज्ञासा जागृत होते. रहस्यात्मक कादंबरींतला हा पहिला टप्पा समजावा लागेल.

यापुढें एकीकडे 'गाय' व क्लेअर यांच्या वाढत्या प्रेमाची हकीगत सांगत असतांना ज्या गुप्त रहस्याचं संकट त्यांच्या प्रणयपथावर अखेर उभं राहणार त्याबद्दल त्या दोघांसहि सर्वस्वीं अज्ञानांत ठेवून, लेखकानं हलके हलके—कधीं मादाम फोवेचं चित्र रंगवितांना, कधीं सॉलिसिटर शॅडबर्न यांच्या मनोगत विचारांच्या साहाय्यानं, कधीं दोन चार गौण पात्रांच्या सहज संभाषणांतल्या एखाद दुसऱ्या उद्गारानं— मादाम फोवेचं पूर्वचरित्र ज्या कौशल्यानं वाचकांसमोर मांडलं आहे तें तंत्रदृष्ट्या नमुनेदार समजावं लागेल. वाचकाच्या मनाला कादंबरीच्या प्रारंभींच बसलेला विस्मयाचा धक्का अंशा-अंशानें वाढत जातो, व ज्या 'गाय'वर क्लेअर लुब्ध झाली तो तिच्या वडिलांच्या परित्यक्त पत्नीचा मुलगा होय ही वस्तुस्थिति जेव्हां वाचकांच्या पूर्ण लक्षांत येते, तेव्हां कथानकाला कांहीं एक नवीनच रंगत चढते. कादंबरींतल्या आनंदी वातावरणाशीं यानंतर वाचकाला समरस होतां येत नाहीं. आकाशांत मोठ्या वादळाची तयारी होत आहे असा त्याला भास होतो. कादंबरींतील

मुख्य पात्रं—गाय व क्लेअर—हसत खेळत असतात, प्रेमिकांनाच शोभेल अशा स्वच्छंदानं, लडिवाळपणानं, एकमेकांशीं वागत असतात. परंतु त्यांचीं वर्णनं वाचून वाचकाला हर्ष होण्याऐवजीं त्यांची करुणा येते. या बिचाऱ्या दोन निष्कपट व निश्चिंत प्रेमिकांची प्रीति शेवटीं विफल होणार अशी वाचकाला भीति वाटत असते; व तीं दोघं आनंदांत असलीं तरी वाचकाला करुणरसाचा अनुभव येतो. रसोत्पत्तीच्या दृष्टीनं या चमत्कारिक घटनेपासून एक महत्त्वाचा सिद्धान्त काढतां येण्यासारखा आहे. तो असा कीं, रस हा रंगभूमीवरील अगर कादंबरींतील पात्रं काय करतात याऐवजीं वाचकाच्या ज्ञानावर व मनोवृत्तीवर कधीं कधीं अवलंबून असतो. तीं पात्रं आनंदानं हसत असलीं तरी प्रेक्षक अगर वाचक यांना तें पाहून हास्याऐवजीं करुणरसाचा प्रत्यय येणं शक्य आहे. रसाच्या उत्पत्तीच्या विविध कारणांचा ज्या वाचकांना अभ्यास करायचा असेल त्यांनीं 'लव्ह रॅक' या कादंबरींतील हा कथाभाग मुद्दाम लक्षपूर्वक वाचावा.

ही कादंबरी म्हणजे एक सुखान्त कथा आहे. परंतु या कादंबरींतील सर्वांत हृदयंगम भाग कोणता असा प्रश्न कुणी मला केला, तर अखेरीस जेव्हां गाय व क्लेअर यांना समग्र वस्तुस्थितीचं ज्ञान होतं, व तें होऊनहि साऱ्या संकटांना धैर्यानं तोंड देऊन तीं विवाहबद्ध होतात, त्या प्रसंगाकडे मी बोट दाखविणार नाहीं. निराळ्याच एका प्रसंगाचा मी निर्देश करीन. तो प्रसंग कादंबरींतल्या मध्यावर आहे—एकंदर तेहतीस प्रकरणांपैकीं पंधराव्या प्रकरणांत तो आहे.

इंग्लंडमध्यें प्रमुख शहरांतून जलसे करीत हिंडतां हिंडतां मँचेस्टर शहरीं असतांना गाय क्लेअरला एक तार पाठवितो. "उद्यां रात्रीं लंडनमधील सेव्हॉय हॉटेलमध्यें मला भेट." आतां त्या

दोघांचं प्रेम पुष्कळच वाढलेलं असतं, व इंग्लंडमधील दौरा संपवून परत फिरण्यापूर्वी क्लेअरची व आपली एकांतीं गाठ पडावी अशी 'गाय'ची इच्छा असते. तो मँचेस्टरहून लंडनला येतो व क्लेअर आपल्या घरून त्याला भेटण्यासाठीं सेव्हॉय हॉटेलमध्यें येते. या ठिकाणीं त्या दोघांची झालेली भेट हीच त्यांची कादंबरींतली पहिली खरी एकांतांतली भेट. या भेटींतच प्रथम तीं एकमेकांचं चुंबन घेतात व गाय क्लेअरला आपल्या बाहुपाशांत घेतो. गाय सेव्हॉय हॉटेलमध्यें दाखल होतो तेव्हां तारेनं धाडलेल्या आपल्या निरोपाप्रमाणें क्लेअर येईलच अशी त्याची खात्री नसते. क्लेअर आपल्यावर अनुरक्त झाली आहे याविषयीं त्याला संशय नसतो, परंतु घरांतल्या मंडळींना दाद लागूं न देतां संकेतस्थळीं येणं तिला साधेल कीं नाहीं याबद्दल त्याच्या मनांत चिंता व भीति असते. एकीकडे तिच्या भेटीसाठी त्याचं अंतःकरण कमालीचं उत्सुक झालेलं असतं, आणि दुसरीकडे नाना प्रकारच्या शंकाकुशंका त्याला छळीत असतात. त्या भव्य प्रासादतुल्य हॉटेलच्या मुख्य दिवाणखान्यांत उभं राहून मुख्य दरवाजाकडे दृष्टि लावून अधीर चित्तानं क्लेअरची प्रतीक्षा करणाऱ्या 'गाय'चं अतिशय सुंदर शब्दचित्र लेखकानं काढलेलं आहे. पाहा.

"साडेसात! अरे राम! आतां खूपच लोक हॉटेलमध्यें येऊं लागले होते. एकामागून एक येऊन हॉटेलपाशीं थांबणाऱ्या खासगी व भाड्याच्या गाड्यांची नुसती रीघ लागून राहिली होती. एखादी खासगी गाडी येऊन दरवाजापाशीं उभी राहिली कीं गायला संताप येई. तिच्यांत क्लेअर नसणार हें त्याला माहीत होतं. टॅक्सी थांबली कीं त्याला अधिक संभव वाटे, आणि प्रत्येक टॅक्सीकडे तो अगदीं उत्सुकतेनें बघे. छे! कुठें आहे क्लेअर ? अरे, कदाचित् त्या खासगी मोटारच्या मागें—च् च्— या बाया गाडींतनं उतरतात

त्या एकमेकींशीं बोलत उभ्या कशाला मरायला राहतात कोण जाणे ! ती गाढव म्हातारडी— बाजूला का होईनास बया ! हां, ठीक. तिच्या नवऱ्यानं तिला दूर केलं. ही पाहा एक टॅक्सी आली. हिच्यांत खचित— पण गेलीच कीं ती पुढें ! ही दुसरी ! आतां मात्र— पण नाहींच ! देवा देवा ! त्या पाहा आणखी दोन भल्या जंगी मोटारी. किती लखलखणारे त्यांचे ते दिवे व त्यांतून खालीं उतरणाऱ्या तरुण स्त्री-पुरुषांच्या हास्याच्या किती हर्षभरित त्या लकेरी ! पण क्लेअर, क्लेअर ! लाडके तूं कुठें आहेस ? आतां ही टॅक्सी आली ! हॉटेलचा पोर्टर दार उघडायसाठीं पुढें झाला. स्वारी मोठी जाडजूड आणि लठ्ठ. आंतून कोण उतरतंय तें दिसतहि नाहीं. फक्त दोन नाजुक पावलं तेवढीं दिसताहेत. होय ? छे !—होय ! अरे तीच कीं !

गाय एकदम पुढें धावला व दाराशीं गेला.

"क्लेअर !" असं तो एकदम आनंदानं उद्गारला. त्याच्या-पुढें क्लेअर उभी होती ! हसणारी, आनंदी आणि तेजःपुंज क्लेअर !"

मग त्या दोघां प्रेमिकांनीं नंतरच्या सात आठ घटकांचा काळ ज्या हर्षनिर्भर सुखांत घालविला त्याचं वर्णन किती करावं !

परंतु रसोत्पत्तीच्या प्राक्रियेचा चमत्कार असा कीं, आपण या प्रकरणांतलीं त्या दोघांचीं अधीर संभाषणं, त्यांचे हास्यविनोद, त्यांचे पुढील सुखप्राप्तीचे बेत, इत्यादींचीं वर्णनं जों जों वाचीत जातों, तों तों आपल्याला त्यांची अधिकाधिक करुणा येते. त्या दोघांच्या प्रेमाचा चुराडा करणारं संकट आपल्याला माहीत झालेलं असतं, आणि त्यांच्या आनंदाशीं आपल्याला समरस होतां येत नाहीं. या सर्व प्रकारांतून दैवदुर्विलासाची अत्यंत शोककारक घटना तर निर्माण होणार नाहीं ना अशा चिंतेनं आपल्या

हृदयाचा थरकांप होत असतो. जिकडे तिकडे सूर्यप्रकाश भरलेला दृष्टीला स्पष्ट दिसावा, परंतु तो चिरकाल टिकणार नाहीं, लवकरच आकाश ढगांनीं व्याप्त होईल, वादळी वारे सुटतील, धुळीचे लोटच्या लोट उठतील, मेघगर्जनेचा गडगडाट होईल आणि वीज कडाडेल हें माहीत असावं म्हणजे माणसाला जसं वाटेल तसं वाचकाला वाटत राहतं. या क्षणीं आनंदानं हसणारे खेळणारे, प्रीतिसाफल्याचे मनोरथ रचणारे हे दोन प्रेमळ जीव लवकरच हृदयविदारक अशा ट्रॅजेडीच्या पाशांत सापडणार आहेत या कल्पनेनं आपला जीव घाबरा होतो; व एकीकडे क्लेअर आणि गाय यांचे प्रसन्न, उल्हासयुक्त संवाद वाचतां वाचतां आपल्याला पुनः पुन्हा डोळयांतले अश्रु पुसावे लागतात! 'लव्ह रॅक' या कादंबरीचा रहस्यात्मक कादंबरीच्या तंत्राचा एक नमुना म्हणून तर वाचकांनीं अभ्यास करावाच; परंतु रसोत्पत्तीचा हा जो चमत्कार मीं आतां वर्णन करून सांगितला त्याचा, व सेसिल रॉबर्ट्सनं जें एक अद्‌भुतरम्य वातावरण निर्माण करून सबंध कादंबरींत खेळविलं आहे त्याचा देखील लक्षपूर्वक अभ्यास केल्यानं नव्या लेखकांचा फार फायदा होण्यासारखा आहे!

---

८ : : प्रमाद

एखाद्या कादंबरीचा विषय विशेष नाविन्यपूर्ण असला, कीं तेवढ्या एकाच गुणाच्या जोरावर तिला विलक्षण लोकप्रियता मिळूं शकते. यासाठीं नवीन नवीन विषय शोधण्याची लेखकांची धडपड नेहमीं चालूं असते. परंतु ललितकृतीच्या द्वारें लोकांपुढें मांडण्यास योग्य असे नवीन नवीन विषय निवडणं वाटतं तितकं सोपं नाहीं. त्यामुळें विषयाच्या नाविन्याऐवजीं तो रंगविण्याच्या पद्धतींत नाविन्य आणण्याची युक्ति कादंबरीकाराला पुष्कळदां वापरावी लागते. विषयाच्या मांडणीच्या नाविन्यामुळें यशस्वी झालेल्या कादंबऱ्यांचीं अनेक उदाहरणं सांगतां येतील; पण अशा कित्येक इंग्रजी कादंबऱ्या मीं वाचल्या आहेत, कीं ज्यांतल्या विषयांतहि नाविन्य नाहीं किंवा मांडणींतहि नाहीं, पण निवेदनाच्या सामर्थ्यामुळें आणि स्वभाववर्णनाच्या चातुर्यामुळें त्या मला लक्षांत ठेवण्यासारख्या वाटल्या. Ernest Raymondची 'We, the Accused' (प्रकाशकCassel and Co. ) ही अशा कादंबऱ्यांपैकींच होय.

या कादंबरीचा विषय अगदीं कमालीचा शिळा आहे. पति, पत्नी आणि ज्या स्त्रीच्या प्रेमपाशांत तो पति सापडतो अशी एक स्त्री हें त्रिकूट ललितवाङ्मयांत आतां इतकं ठराविक झालं आहे, कीं

अशा त्रिकूटाचीं सुख-दुःखं वाचकांना अगदीं तोंडपाठ झालीं आहेत व एखाद्या कादंबरीच्या पहिल्या एक-दोन प्रकरणांत जर हें ठरीव ठशाचं त्रिकूट भेटलं तर कादंबरी पुढें वाचण्याऐवजीं पुस्तक मिटून दूर टाकण्याची इच्छा वाचकाला होणं साहजिकच आहे. पण 'We, the Accused' या कादंबरींत ह्या त्रिकूटाचाच शिळा विषय असूनसुद्धां ती अत्यंत सरस वठली आहे; आणि या कादंबरीचे कांहीं गुण इतके प्रभावी आहेत, कीं त्यापुढें तिच्यांतील अनेक अवगुणांचा विसर पडतो.

मला वाटतं कथानकाची कौशल्याची गुंतागुंत वाचकाच्या मनाची हमखास पकड घेते हें जरी खरं असलं तरी अशा कथानकाच्या पुष्कळ कादंबऱ्या निर्माण झाल्या म्हणजे वाचकाला थोडासा रुचिपालट हवासा वाटूं लागतो, आणि असं झालं म्हणजे मग ज्या कादंबरीचं कथानक अगदीं कमालीचं साधं आहे अशी कादंबरी त्याला चटकन् मोह पाडते. 'We, the Accused' ही कादंबरी अशाच प्रकारची आहे, व तिचं कथानक सांगायचं झालं तर एका लहानशा परिच्छेदांत सांगतां येईल.

पॉल प्रेसेट नांवाचा एक शाळा-मास्तर होता. वयाच्या पन्नासाव्या वर्षापर्यंत त्यानं आपली पत्नी एलिनॉर हिच्याशीं निर्वेधपणें संसार केला. एलिनॉर सतत रुग्णशय्येवर पडलेली असल्यामुळें विषयसुखाला तो अंतरलेला होता; तथापि आपल्या संसारसौख्यांतली ही उणीव त्याला कधीं जाणवली नव्हती. पण त्याच्याच शाळेंतील मायरा बॅान नांवाच्या एका मास्तरणीचं व त्याचं जेव्हां प्रेम जमलं तेव्हां मात्र त्याचा तोल एकदम सुटला. पॉल पन्नास वर्षांचा होता. मायरा तीस वर्षांची होती. परंतु परस्परांविषयींच्या अनुरागानं तीं दोघं एकमेकांकडे आकर्षित होतांच ऐन पंचविशींतल्या तरुण प्रेमिकांप्रमाणं त्यांची अवस्था

झाली. तथापि मायरा विचारशील होती. पॉलच्या व आपल्या प्रेमाचे परिणाम चांगले होणार नाहींत अशी भीति वाटूं लागतांच तिनं पॉलचा निरोप घेतला, नोकरी सोडली व स्थलांतर केलं. पण पुढे थोड्याच दिवसांत एलिनॉरचं दुखणं विकोपाला गेलं. ती लवकर मरेल तर सौख्यहीन संसाराच्या बंधनांतून आपण एकदां कायमचे सुटूं असे विचार पॉलच्या मनांत बळावूं लागले. याच सुमारास बागायतीच्या कामीं रानरोपटीं मारून टाकण्यासाठीं उपयोगांत आणण्याच्या औषधाचा डबा पॉलच्या हातीं आला होता. एके दिवशीं एलिनॉर अत्यवस्थ होऊन ओरडूं लागली तेव्हां तिला ब्रॅंडी देतांना बागायतीच्या कामीं वापरलेल्या त्या डब्याच्या तळाशीं उरलेलं थोडंसं औषध पॉलनं त्या ग्लासांत टाकलं. त्या औषधांत अर्सेनिकचा अंश होता. ब्रॅंडीचा तो ग्लास प्याल्यावर एलिनॉर थोड्याच वेळांत मेली. तिचं दुखणं विकोपाला गेलं म्हणून ती मेली, कीं पॉलनं दिलेल्या अर्सेनिकनं मेली हें सांगणं खरं म्हटलं तर कठीण होतं. पण तिच्या पोटांत विष गेलं हें खरं, आणि आपण एलिनॉरला मारली अशी पॉलच्या मनाला रुखरुख लागून राहिली हेंहि खरं. एलिनॉरच्या मृत्यूनंतर थोड्याच दिवसांनीं पॉलनं मायराचा नवा पत्ता शोधून काढला. आतां त्या दोघांना प्रत्यक्ष विवाहबद्ध होण्यापूर्वी औचित्याच्या दृष्टीनं कांहीं काल थांबणं जरी आवश्यक होतं तरी त्यांच्या प्रेमाला आतां अडथळा उरला नव्हता. तीं दोघं एकमेकांना वारंवार भेटूं लागलीं व एकमेकांच्या सहवासाचं सौख्य मनसोक्त घेऊं लागलीं. पण त्यांच्या या गाठीभेटी लोकांच्या डोळ्यांवर आल्या. एलिनॉरच्या मृत्यूपूर्वीहि त्या दोघांचे जे संबंध होते त्यांना वाच्यता फुटली आणि शेजारीपाजारी कुजबुजूं लागले, कीं एलिनॉरच्या मृत्यूच्या बुडाशीं कांहीं तरी भानगड असावी. अखेर ही कुजबुज इतकी वाढली, कीं पोलिसांना त्या

बाबतींत लक्ष घालावं लागलं. एलिनॉरचं प्रेत उकरण्यांत आलं, आणि त्याची तपासणी झाली, तेव्हां तिच्या पोटांत अर्सेनिक सापडलं. इतकं होतांच पॉल घाबरला व मायराला घेऊन पळाला. पण पोलिसांनीं अखेर त्याला पकडलं, त्याच्यावर खटला चालला व अखेर त्याला फांशीं देण्यांत आलं.

कादंबरीचं कथानक येवढंच आहे. यांत कथानकाची मोठी चतुराईची गुंफण तुम्हांला दिसते? मुळींच नाहीं. पेचप्रसंग, निरगाट, उकल इत्यादि तंत्रं मोठ्या कसोशीनं संभाळलेलीं दिसतात? तसंहि म्हणतां यायचं नाहीं. म्हणूनच मीं मघांशी म्हटलं, कीं या कादंबरीच्या कथानकाचा कमालीचा साधेपणा हेंच तिचं एक मोठं आकर्षण आहे. लहानशीच गोष्ट आहे, आणि ती अगदीं सरळ सांगितलेली आहे. मात्र या सरळ साध्या निवेदनांत लेखनाचं असं कांहीं अजब सामर्थ्य ओतलेलं आहे, कीं कादंबरीचा मनावर फार मोठा परिणाम होतो.

या कादंबरीचा सहाशेंतीस पानांचा विस्तार अगदीं प्रमाणशून्य आहे. तीनशें पानांच्या मर्यादेंत ही कादंबरी खचित लिहितां आली असती. लेखकानं कादंबरीचे पांच विभाग केले आहेत. पहिल्या विभागांत पॉल प्रेसेटच्या संसाराचं वर्णन केलं असून पॉल व मायरा यांच्या प्रेमाची वाढ वर्णिलेली आहे. या निषिद्ध प्रेमप्रकाराच्या परिणामांची भीति वाटून मायरा पॉलला सोडून जाते त्याचीहि हकीकत दिलेली आहे. आणि एलिनॉरचा मृत्यु होतो त्या ठिकाणीं भागाचा शेवट केलेला आहे. दुसऱ्या भागाच्या पहिल्या चार प्रकरणांत पॉल व मायरा यांची पुनर्भेट घडून येते व त्यांचं प्रेम अनिर्बंध वाढूं लागतं असं दाखवलं आहे. आणि त्यानंतर पॉलनं आपल्या बायकोला मारली असावी अशी कुजबुज लोकांत कशी वाढूं लागली, व अखेर पोलिसांनीं

चौकशीला आरंभ कसा केला इत्यादि गोष्टी सांगितलेल्या असून सरकारी तपासणींत एलिनॉरच्या पोटांत विष गेल्याचं उघडकीस येतं त्या ठिकाणीं भागाचा शेवट केलेला आहे. तिसऱ्या भागांत पॉल व मायरा यांच्या पलायनाचं, चौथ्या भागांत पॉलवरच्या खटल्याचं, आणि अखेरच्या पांचव्या भागांत त्याच्या फाशीचं अशीं वर्णनं आहेत. तिसरा, चवथा व पांचवा या विभागांचा पाल्हाळ अगदीं नकोसा वाटतो. पळतां पळतां पॉल व मायरा पोलिसांच्या हातीं सापडलीं एवढं वाचल्यावर वाचक मनांतल्या मनांत पूर्णपणें समजून चुकतो, कीं आतां पॉलच्या आयुष्याचा ग्रंथ आटपला, आणि कादंबरीच्या ग्रंथाचा उरलेला भाग वाचण्याची विशेष उत्कंठा त्याच्या ठिकाणीं उरत नाहीं. वाचकाची उत्कंठा थोडी फार तरी डवचली जाते ती फक्त पहिल्या दोन भागांत. सारांश, प्रस्तुत कादंबरीचा उत्तरार्ध मनोवेधकतेच्या दृष्टीनं अगदीं सपाट झालेला आहे. पण तिचा पूर्वार्ध फार कौशल्यानं रंगविला आहे, आणि उत्तरार्धांतहि कांहीं विवक्षित स्थळीं लेखकाचं हें कौशल्य प्रत्ययाला आल्यावांचून राहत नाहीं. याबद्दलच आतां कांहीं गोष्टी मी विस्तारानं सांगणार आहे.

रचनाचातुर्य या सदराखालीं येण्यासारखी या कादंबरींत एकच गोष्ट आहे. ती म्हणजे ज्या युक्तीनं आर्सेनिकच्या मिश्रणाचा डबा पॉलला कादंबरीकारानं मिळवून दिला आहे ती. कादंबरीच्या सुरुवातीपासूनच पॉलचं जें स्वभावचित्र दिसतं त्यावरून खात्री होते, कीं तो एक अतिशय सात्त्विक वृत्तीचा, दयाळु अंतःकरणाचा आणि पापभीरु असा सज्जन गृहस्थ होता. त्यानं आपल्या जीविताचा निम्मा अधिक प्रवास स्त्रीसौख्यावांचून रुक्षपणानं केला होता खरा, आणि त्या प्रवासाच्या मध्यावर तो आलेला असतांना मायराचं जें प्रीतिसौख्य त्याला अकल्पितपणें लाभलं होतं त्याचा

त्याला विलक्षण मोह पडला होता हेंहि खरं; परंतु मायराच्या प्राप्तीसाठीं आपल्या पत्नीचा प्राणघात करण्याइतका तो स्वभावानं दुष्ट मुळींच नव्हता. किंबहुना प्रेमळपणा आणि भित्रेपणा या त्याच्या स्वभावांतल्या नरम जागा होत्या; व आयुष्यांत त्याच्या हातून ज्या भयंकर चुका घडत गेल्या त्या यांच्या योगानंच. कादंबरीच्या अखेरीस पॉलचा मृत देह जेव्हां फांसावरून खालच्या खड्ड्यांत पडला त्या वेळीं लेखक म्हणतो, "And in the silent pit, the pinioned and wrecked body with its hooded head at a foolish angle, swung perceptibly no more, but sometimes twisted round and back again; round and back again; the body of a man who had foundered." या वर्णनांतल्या "a man who had foundered" या शब्दांत पॉलच्या एकंदर स्वभावाचं सार आलं आहे असं म्हटलं तरी चालेल. दुबळेपणानं आणि भित्रेपणानं ज्यानं वेड्यासारख्या चुका करून स्वतःवर विनाकारण प्राणसंकट ओढवून घेतलं अशा माणसाची शोककथा या कादंबरींत आहे. पॉल प्रेसेट प्रेमाचा भुकेला होता. रुक्ष संसाराला तो कंटाळलेला होता. मायरा त्याला अतिशय हवी होती. पण इतकं असूनहि एलिनॉरचा खून करण्याची दुष्ट ताकद त्याच्या अंगीं नव्हती. बाजारांतून एखादं विष विकत आणून तो तें आपल्या बायकोला देईल हें शक्य नव्हतं. परंतु त्यानं तिला विष पाजलं असं तर लेखकाला दाखवायचं होतं. अर्थात् त्यानं विष आणलं नाहीं, तर तें त्याच्या हातीं योगायोगानं आलं अशा घटनेची योजना करणं त्याला भाग होतं आणि ही योजना Ernest Raymond यांनीं मोठ्या चातुर्यानं केली आहे. कशी ती पाहा:

मायरा त्याला सोडून गेल्यानंतर पॉलची अवस्था मोठी

अनुकंपनीय झाली. त्याला एलिनॉरबरोबर संसारांत आनंद कधीं मिळाला नव्हताच; आणि मायराच्या प्रीतीच्या रूपानं त्याच्या जीवनांत उन्मादक उल्हासाचे प्रकाशकिरण पुरते आले न आलें तोंच ते नाहींसे झाले होते. मायराच्या वियोगाचं दुःख त्याला असह्य झालं. त्याचा विसर पडावा म्हणून तो आपल्या अंगणांत बागकामांत लक्ष घालूं लागला. बागकामाची त्याला कांहींच माहिती नव्हती, व फुलझाडांच्या वाफ्यांत जीं रानरोपटीं उगवत तीं रोज उपटून काढतां काढतां तो अगदीं त्रासून जाई. एके दिवशीं अशा प्रकारें त्रासून वाफ्यांतलीं रानरोपटीं उपटत असतांना शेजारच्या 'ब्रिस्कॉल'ची बायको त्याला म्हणाली, "माझ्या नवऱ्याला रानरोपटीं मारून टाकण्याचं औषध माहीत आहे. त्याला मी सांगूं का तुम्हांला मदत करायला ? त्याच्याजवळचं तें औषध रानरोपट्यांवर शिंपडलं, कीं हां हां म्हणतां तीं मरून जातील." हा तिचा सल्ला साहजिकपणेच पॉलला पटला, आणि त्यानं ब्रिस्कॉलची मदत घेतली. जें औषध रानरोपट्यांवर शिंपडायचं ते अर्सेनिकपासून कसं तयार केललं असतं व त्याचा चमचाभर घोट जरी पोटांत गेला तरी मनुष्य कसा मरेल इत्यादि गोष्टींचं वर्णन बडबड्या ब्रिस्कॉलनं पॉलजवळ केलं. पॉलच्या बागेंतल्या रानरोपट्यांवर औषध शिंपडल्यावर औषधाचा रिकामा डबा तिथेंच टाकून ब्रिस्कॉल घरीं गेला. आपण पॉलच्या मनांत कोणत्या भयंकर विचाराचं बीज पेरलं त्याची त्याला बिचाऱ्याला काय कल्पना! पण त्याला कल्पना नसली तरी तें पेरलं गेलं खरं. तो गेल्याबरोबर पॉलनं तो रिकामा डबा उचलून पाहिला तेव्हां त्याच्या तळाशीं दोन तीन चमचे द्रव्य शिल्लक राहिलेलं त्याला दिसलं. तें पाहतांच पॉलच्या मनांत राक्षसी विचार येऊं लागले. क्षणभर त्याला वाटे, तो डबा दूर

भिरकावून द्यावा. पुन्हा त्याला वाटे नको, असेना का तो आपल्याजवळ! या वेळच्या पॉलच्या मनःस्थितीचं वर्णन लेखकानं फारच बहारीनं केलेलं आहे. तें विस्तारानं सांगण्याचा मला मोह होतो, पण तो आवरून मी येवढंच सांगतों, कीं संभाव्यतेचा यत्किंचित्‌हि भंग न करतां मोठ्या सफाईनं लेखकानं पॉलच्या हातीं विष कसं आणून दिलं आहे तें पाहण्यासारखं आहे.

लेखकाच्या या चतुराईच्या योजनेंत आणखीहि एक फार मोठी गंमत आहे ती मला सांगितली पाहिजे. एलिनॉर ज्या वेळीं दुखण्यानं अत्यवस्थ होते त्या वेळीं त्या डब्याच्या तळाशीं असलेल्या द्रव्याचा चमचाभर भाग पॉल तिच्या ब्रँडींत मिसळून देतो. पण खरं पाहतां त्या विषानंच एलिनॉर मेली असं म्हणणं फार कठीण आहे. कारण विषारी औषधाचा तो डबा कित्येक दिवस तसाच पडला होता, व त्यामुळें त्यांत अर्सेनिकचा अंश खरोखरच शपथेलाच उरलेला असेल. एलिनॉर अत्यवस्थ झाली तेव्हां तिला इतक्या प्राणांतिक वेदना होत होत्या, कीं पॉलनं दिलेली ब्रँडी तिनं जरी घेतली नसती तरी ती मेली असती. म्हणजे त्या ब्रँडींतल्या अर्सेनिकनं ती मेली असं तर स्पष्ट म्हणतां येऊं नये, पण तिची हत्या आपण केली असं पॉलला मात्र वाटावं, आणि पुढें नांवाला का होईना पण एलिनॉरच्या पोटांत अर्सेनिक सापडल्यामुळें कायद्याच्या दृष्टीनं पॉल खुनी ठरावा अशी प्रसंगरचना लेखकानं साधली आहे. पॉलविषयीं वाचकांच्या मनांत द्वेष अगर तिटकारा उत्पन्न न होतां सहानुभूतीच कायम राहते ती या रचनेंतील कौशल्यामुळेंच.

रचनाचातुर्याचा येवढा भाग सोडला तर बाकीचं कथानक अगदीं साधं आणि सरळ आहे. वाचकाच्या उत्कंठेला ताण देण्याचा अगर वाचकाला विस्मयाचा धक्का देण्याचा विशेष प्रयत्न

लेखकानं कुठेंच केलेला नाहीं. कादंबरीची एकंदर रंगत साधण्या-साठीं त्यानं फक्त दोनच गोष्टींवर भर दिलेला आहे. एक, जागोजाग केलेलीं मनोहर सृष्टिवर्णनं, आणि दुसरी, पॉल व मायरा यांचीं स्वभावचित्रं रंगवितांना वापरलेली कमालीची कुशलता. या दोन बाबतींत लेखकानं जें सामर्थ्य दाखवलं आहे त्याचा मात्र अवश्य अभ्यास करावा.

सृष्टिवर्णनाच्या बाबतींत उपमालंकाराचा हव्यास मराठी लेख-कांना अजून सोडवत नाहीं; परंतु तो त्यांनीं सत्वर सोडला पाहिजे, आणि सृष्टि ज्या वेळीं जशी दिसते तशी दिसते तशी शब्दांनीं रंगविलीं तर रंगचित्राप्रमाणेंच तीं शब्दचित्रं आल्हाददायक होतात हा उमज त्यांनीं घेतला पाहिजे. मला स्वतःला तरी आतां साधीं, सरळ सृष्टिवर्णनं करण्याची पद्धति अधिक परिणामकारक वाटते. युरोपियन लेखकांच्या गेल्या दहा पांच वर्षांतल्या नामांकित कादंबऱ्या वाचल्या तर त्यांनीं हीच पद्धति अंगीकारलेली दिसेल. "We, the Accused" या कादंबरींतलीं ठिकठिकाणचीं सृष्टिवर्णनं कशीं आहेत तें वाचकांस कळावं म्हणून तिच्या ८५ व्या पृष्ठावरचा, पहिल्या भागाच्या आठव्या प्रकरणाच्या प्रारंभींचा परिच्छेद खालीं देतों :

"Paul looked from the window of the train as it crossed a bridge over the Thames. It was a morning of St. Luke's summer. A pale blue sky arched over London, and a low sun lit the silken river and turned the buildings on the Northern side into the palaces of an enchanted city. Spires and towers and domes, and tall

chimneys even, stood wrapped in colour drawn from mother-of-pearls; and these colours found an answer in the tints on the fringes of fleecy clouds. Where the tide was, he did not know, but the broad river seemed as still as the sky, so that the traffic on the embankment moved between the stillness below and the stillness above... By a miracle of light, London was corrected of every flaw and made perfect at last. What was the mischief of the Gods, that they gave to men these moments when their hunger for perfection was satisfied? Did the gift mean anything? Did it promise anything? Or was it, like the brief blooming of a flower, its own justification and no more?..."

हा उतारा लक्षपूर्वक वाचला तर वाचकांच्या लक्षांत येईल, कीं सृष्टीचं स्वरूप तर मोठ्या मार्मिक व वेचक शब्दांत लेखकानं अगदीं जसंच्या तसं आपल्या डोळ्यांपुढें उभं केलं आहेच; पण शिवाय वर्णनाच्या अखेर मानवी मनाच्या प्रतिक्रियेचा एक फटकारा मारून त्या सृष्टिचित्राला अधिक रमणीयता आणली आहे. सृष्टीचा देखावा रंगवितांना त्यांत कुठं तरी एखादी मनुष्याकृति काढून जो परिणाम एखादा कुशल चित्रकार साधतो त्याच्यासारखाच हा परिणाम होय. हा असला परिणाम उत्पन्न करण्याकडे Ernest Raymond यांचं नेहमीं विशेष लक्ष असलेलं मला या कादंबरीत आढळलं. सृष्टीचं स्वरूप आणि पात्रांची मनःस्थिति यांतील साम्यविरोध दर्शविण्याच्या या युक्तीचा नव्या लेखकांनीं

अवश्य अभ्यास करावा. या युक्तीचं आतिशय नमुनेदार असं एक उदाहरण ' We, the Accused ' या कादंबरींतून देतों.

पॉल व मायरा पोलिसांचा पाठलाग चुकवितां चुकवितां अखेर जेव्हां त्यांच्या हातीं सापडलीं त्या वेळचं वर्णन पाहा. पुढें पोलीस, मागें पोलीस अशा पहाऱ्यांत चालतां चालतां पॉलनं पश्चिम क्षितिजाकडे दृष्टि टाकली तों तिथें सूर्यास्ताची अवर्णनीय शोभा त्याला दिसली.

" The sun was a golden moon, surrounded with a yellow-green light; and it was so low now as to bear a man's gaze. To either side of it the hills were turning a deeper and deeper purple as it sank. The lake was a sheet of silver. The sun's rim dipped beneath the hill and you could see the disc go...... Was it the last sunset he would see, Paul wondered listlessly... Then a tenuous cloud-wraith passed over the hidden bed of the sun and turned to crimson, so that it looked like the motionless smoke of a conflagration far away; and gradually its crimson reflection spread over the surface of the lake. One more sun forever lost. Everything seemed hushed by the first presage of the dark; and the few sheep that they passed were couched on their hooves, as if in readiness for the night. Held in silence by the stillness of

the evening, the little group of people walked on."

कादंबरीच्या एका महत्त्वाच्या विभागाच्या अखेरचं हें वर्णन वाचल्याबरोबर आपलं अंतःकरणहि एक प्रकारच्या शांतीनं, गांभीर्यानं आणखी आगामी घटनेच्या कांहींशा भयानं भरून येत नाहीं काय ?

परंतु आतांपर्यंत 'We, the Accused' या कादंबरीचे जे विशेष गुण मीं वाचकांच्या निदर्शनाला आणले त्याहूनहि तिच्यांतील अधिक सामर्थ्यवान् गुण कोणता असेल तर पॉल व मायरा यांच्या मनःस्थितीच्या सूक्ष्म आणि विविध छटा दाखविण्यांत लेखकानं वापरलेलं कौशल्य. पॉल व मायरा यांच्या प्रत्येक भेटीचा प्रसंग—मग तो अतीव सुखाचा असो किंवा आत्यंतिक दुःखाचा असो—मनोवेधकच झालेला आहे. लेखकानं पॉलचा स्वभाव कसा दाखविला आहे तें मघांशीं एकदां मीं सांगितलंच. त्या स्वभावाशीं सर्वस्वीं सुसंगत असं प्रत्येक ठिकाणीं त्याच्या मनाचं चित्र लेखकानं उभं केलेलं आहे. तो साधा आहे, भोळा आहे, कांहींसा अविचारी आणि बराचसा भित्रा आहे. पण मायरावर त्याचं पराकाष्ठेचं प्रेम आहे, आणि प्रीतीवर त्याची विलक्षण निष्ठा आहे. अशा या माणसाचे मनोगत विचार भिन्न भिन्न प्रसंगीं लेखकानं ज्या विलक्षण सहानुभूतीनं व्यक्त केले आहेत त्यांचीं किती म्हणून उदाहरणं देऊं? एक दोनच सांगतों.

एलिनॉरच्या मृत्यूनंतर पॉलची व मायराची पुनर्भेट झाली तेव्हां वाटेनं चालतां चालतां आपापल्या नोकऱ्यांची जबाबदारी संभाळून एकमेकांच्या गाठीभेटी केव्हां घेतां येतील याची चर्चा तीं दोघं करूं लागलीं. पॉल म्हणाला,—

"म्हणजे गुरुवार आणि रविवार येवढे दोनच दिवस आपल्याला सापडणार असं दिसतं!"

मायरानं मान हलविली. "हं, असं दिसतं खरं."

मग झटकन् तिचा हात पकडून त्यानं रस्ता ओलांडून तिला बाजूच्या झुडुपांत नेलं, अन् तिथं तिला एकदम बाहुपाशांत घेऊन तिचं चुंबन घेतलं. तिनं आपले ओठ पुनः पुन्हा त्याच्या ओठांवर फिरविले अन् अखेर आपला प्रीतीचा आवेग आवरून उसासा टाकीत ती म्हणाली, "छे, पण इतकं सुखी व्हायचा आपल्याला अधिकार आहे काय?"

"आहे, लाडके...खचित आहे!"

"आपण एकादी मोठी चूक तर करीत नाहीं ना? हें सारं योग्य आहे का?"

"अर्थात्! खरी प्रीति सदा योग्य असते."

दुसरं एक उदाहरण देतों.

फांशीच्या आधीं तुरुंगावरच्या अधिकाऱ्याच्या परवानगीनं त्याची व मायराची जेव्हां अखेरची भेट होते, तेव्हां तो तिला म्हणतो,

"मायरा, माझ्या आयुष्यांत तुझ्या रूपानंच प्रकाश आणि सौंदर्य आलं हें नेहमीं लक्षांत ठेवलंस म्हणजे माझ्या मृत्यूनंतर तुला एक प्रकारच्या समाधानांत राहतां येईल. माझं आयुष्य व्यर्थ गेलं असं मला वाटत नाहीं. कारण या आयुष्यांत तूं मला भेटलीस...मी कांहीं एखादा सत्पुरुष नाहीं; पण लोकांनीं ठरविलं तितका वाईट मी खचित नाहीं. आणि माझ्या चांगलेपणावर तुझी श्रद्धा असेल, तर लोक काय समजतात त्याची मला कांहींच पर्वा नाहीं."

अशींच आणखी किती तरी रम्य स्थळं कादंबरींत आहेत.

मात्र पॉलपेक्षांहि मायराचं स्वभावचित्र अधिक चित्तवेधक झालेलं आहे. पॉलविषयींच्या तिच्या प्रेमाचं स्वरूप इतकं उज्ज्वल आणि त्यागशील दिसतं, कीं कादंबरी वाचून संपविली कीं फांशीं गेलेल्या पॉलविषयींचं दुःख आपल्या मनांत अधिक दाटलं आहे, कीं मागें राहिलेल्या मायराविषयींचं दुःख आपल्या मनाला अधिक कष्टी करीत आहे तें वाचकाला क्षणभर कळत नाहीं !

तिच्या व पॉलच्या गाठीभेटी प्रथम सुरू होतात तेव्हां, वाढत्या प्रेमाची भीति वाटून ती त्याला सोडून जाते तेव्हां, मग पुनर्भेटीनंतर पॉलची सुखलालसा तृप्त करण्यासाठीं तो करील त्या त्या बेताला ती अनुमति देते तेव्हां, आणि अखेर खुनाचा आरोप आपल्यावर येणार असं वाटून पॉल पलायन करतो व ती त्याच्याबरोबर सतत राहून त्याचं रक्षण करते व त्याला धीर देते तेव्हां, प्रत्येक प्रसंगीं तिच्या स्वभावांतला त्याग आणि उदात्त-पणाच अगदीं स्पष्ट स्पष्ट दिसतो.

तिचं आणि पॉलचं एकमेकांवर प्रेम बसलं आणि तीं दोघं रानावनांतल्या एकान्ताच्या जागा काढून एकत्र हिंडूंफिरूं लागलीं त्या वेळच्या पॉलच्या व मायराच्या मनोवृत्तींतला भेद लेखकानं मोठ्या मार्मिकपणें दाखविला आहे. पॉलच्या तिच्यावरील प्रेमांत वैगुण्य होतं असं नव्हे, पण त्याच्या पुरुषी वृत्तीला तिचा नुसता सहवास पुरेसा वाटत नव्हता. तिच्या प्रेमाबरोबरच तीहि त्याला हवीशी वाटत होती. उलट मायराची वृत्ति विशुद्ध आणि मुग्ध होती. शारीरिक सुखाच्या कल्पनेपासून तिचं मन अलिप्त होतं. या मुग्धतेमुळें, आणि कांहीं अंशीं स्त्रीसुलभ भित्रेपणा-मुळें, पॉल जेव्हां जेव्हां तिच्याजवळ विषयसुखाची मागणी करी तेव्हां तेव्हां त्याला निराश न करतां ती चातुर्यानं त्याची मागणी

टाळीत असे. एकदां एकान्तस्थळीं जवळ जवळ बसून तीं दोघं बोलत असतां पॉल तिला म्हणाला,

" किती सुंदर भाषण तुझं ! तूं विलक्षण गोड आहेस ! "

" कांहीं तरीच काय ? "

" खोटं नाहीं, तूं फार गोड आहेस ! जगाच्या व्यवहाराचा केवढा समज तुझ्या ठिकाणीं आहे ! स्वतःच्या आणि लोकांच्या वागणुकींतल्या खऱ्याखोट्याचे अंश तूं किती बरोबर ओळखतेस ! "

" तसं नाहीं. खरी गोष्ट अशी आहे, कीं, सदसद्विवेकबुद्धि का काय म्हणतात ती तुमच्यापेक्षां माझ्या ठिकाणीं कमी आहे. मला तर वाटतं माझ्या ठिकाणीं ती मुळींच नसेलहि. "

" तर तर ! तुझ्या ठिकाणीं जर सदसद्विवेकबुद्धि नाहीं, तर माझी मागणी कां मान्य करीत नाहींस ? "

" कसली मागणी ? मी नाहीं समजलें—"

" तूं समजली आहेस– आणि तुझी सदसद्विवेकबुद्धीच आड येते आहे."

" हं, असं म्हणतां होय ? पण मला सदसद्विवेकबुद्धि नाहीं याचा अर्थ लहान गोष्टींत नाहीं. तुमचं मागणं फार मोठं आहे."

" मायरा, तूं हो म्हणणार कीं नाहीं ? "

ती नजर फिरवून हिरवळीच्या गवताकडे पाहत राहिली, अन् गवताचं एक पातं उपटून त्याच्याशीं खेळत ती हलकेच म्हणाली, " कदाचित्...पुढें कधीं तरी...एखाद्या दिवशीं..."

परंतु मायराच्या मनाचा हा मुग्धपणा आणि निग्रह किती दिवस टिकण्यासारखा होता ? पुढें लवकरच एकदां तीं अशीं एकत्र फिरत असतां—

" तीं दोघं झाडीच्या दाट भागांत आलीं. पॉलनं तिचा हात झटकन् पकडला आणि जरा अंतरावर उतरणीच्या जागीं रानगवत

खूप माजलं होतं त्या जागीं तिला नेलं. विस्मयानं हसल्यासारखं दाखवून तिनं विचारलं, "हें काय, वाट सोडून इकडे कुठें चाललों आहोंत आपण?" पण कसल्या तरी अनामिक अपेक्षेनं तिच्या आवाजांत कंप आला होता. पॉल म्हणाला, "वेडी, चल, जगांत सुख कांहीं वायां चाललं नाहीं." आणि त्यानं आणखी आणखी दाट गवतांतून तिला दूर नेलं. आणि मग एकदम तृणशय्येवर अंग टाकून त्यानं जेव्हां आपल्या बाहुपाशांत तिला ओढलं तेव्हां तिनं प्रतिकार केला नाहीं. त्याच्या खांद्यावर तिनं आपलं मस्तक टेकलं, आणि तिच्या गालावर आणि मानेवर जेव्हां तो तिला थोपटूं लागला तेव्हां तिनं डोळे मिटून घेतले आणि तिचे ओठ सूक्ष्म हास्यामुळें विलग झाले. मात्र त्याच्या हाताचा स्पर्श वक्षःस्थलाला होतांच ती दूर झाली व हलकेच म्हणाली, "नको-नको, पॉल, नको" परंतु पॉलनं आपला हात दूर केला नाहीं; आणि तिच्या तोंडून पुनः पुन्हा "पॉल" असा जो असहायतेचा कोमल उद्गार निघाला त्यावरून त्याच्या त्या प्रेमस्पर्शामुळं तिला सुखहि होत होतं आणि भयहि वाटत होतं, तो तिला हवासाहि वाटत होता आणि नकोसाहि वाटत होता हें उघड होतं. मधेंच एक-दोनदां भ्यालेल्या हरिणीच्या नजरेनं तिनं त्याच्याकडे पाहिलं, पण त्याचं मस्तक ती कुरवाळीत राहिली. आणि अखेर जीविताच्या प्रेरणेला ती वश झाली!..."

स्त्रीस्वभावाचं इतकं मार्मिक वर्णन सहज कुठें सापडण्यासारखं आहे काय!

आणि शिवाय हें लक्षांत ठेवण्यासारखं आहे, कीं यापुढें मायराचं प्रेम जरी पूर्वीसारखं विदेही राहिलं नाहीं, तरी त्यांतला आत्मत्यागाचा अंश कमी झाला नाहीं. एलिनॉरच्या मृत्यूनंतर पॉलची व तिची पुनर्भेट घडली आणि त्याची इच्छा तृप्त करण्या-

साठीं तो म्हणेल त्या ठिकाणीं ती जाऊं लागली तेव्हां सुद्धां स्वतःच्या सुखापेक्षां पॉलला सुखी करण्याचीच इच्छा तिच्या ठिकाणीं अधिक होती. पॉलला चोरून भेटण्यांत केवढं साहस आहे, कुणी आपल्याला पाहिलं तर आपली व त्याची केवढी बेअब्रू होईल या विचारांनीं ती प्रत्येक वेळीं अतिशय भयभीत होई, आणि तरीहि लज्जा आणि भय यांचे पाश ती तोडून टाकी; कारण—

"आपल्या आलिंगनानं आपला पॉल अत्यंत सुखी होतो हें तिला समजलं होतं. आजपर्यंत क्षुधितच राहिलेल्या तिच्या स्त्री-सुलभ वासना, आणि तिच्या ठिकाणच्या मातृत्वाच्या ऊर्मी पॉलच्या सहवासांत उचंबळून येत, आणि आपण त्याला अमर्याद सौख्य, आनंद आणि समाधान देऊं शकतों ही जाणीव तिला परम सुखाची वाटे. त्याच्या स्पर्शानं तिचा देह तर रोमांचित होत असेच, पण आपली काया पॉलचं सुखनिधान आहे या जाणीवेमुळे तिचं अंतः-करण विलक्षण तृप्तीनं भरून येई."

पुढें पॉलवर संकट आलं, त्यानं पळून जायचं ठरवलं, तेव्हांहि तिचं त्याला पुनः पुन्हा सांगणं एकच, कीं "पॉल, तुझं सुख तें माझं सुख आणि तुझं दुःख तें माझं दुःख. मीं जगाची कधींच पर्वा केली नाहीं, अन् आतां तर मुळींच करणार नाहीं. माझं काय व्हायचं असेल तें होऊं दे; मी तुला क्षणभरसुद्धां विसंबणार नाहीं." आणि खरोखरच ती त्याप्रमाणें वागली.

तिची आणि पॉलची तुरुंगांत अखेरची भेट झाली तेव्हां शेवटीं तो तिला म्हणाला,

"मायरा, आतां आणखी एकच गोष्ट तुझ्या तोंडून मला ऐकायची आहे."

"कोणती रे!"

“ तुझं आयुष्य मीं भारी दुःखाचं करून टाकलं त्याबद्दल तूं मला क्षमा केलीस असं सांग.”

“ सांगितल्यावांचून तुला ते पटत नाहीं का?”

“ आणखी असं सांग कीं, तुला दुःख देण्याचा माझा हेतु नव्हता याबद्दल तुझी खात्री आहे. ज्या गुन्ह्याबद्दल मला उद्यां मरण येणार तो मला खरंच करायचा नव्हता. तुला सुखी करावं येवढ्या एकाच इच्छेनं माझ्या हातून—”

“ होय रे, मला माहीत आहे. आणि हें बघ, मी काय म्हणतें तें नीट ऐक. मला असं वाटतं, आपल्या सगळ्यांच्याच हातून चुका घडतात—कधीं कधीं मोठ्या भयंकर चुका—पण—” तिचे ओंठ थरथर हालले, आणि ती आतां स्फुंदून रडूं लागणार असं वाटलं.

“ पण ?— पण काय मायरा ?”

“ पण असं, कीं माणूस एकंदरींत चांगलं आहे कीं वाईट आहे ही सगळ्यांत महत्त्वाची गोष्ट आहे. आणि लोकांनीं कांहींहि म्हटलं तरी एका चांगल्या माणसानं माझ्यावर प्रेम केलं अशीच श्रद्धा माझ्या अंतःकरणांत सतत राहील.”

इतकं बोलून हातरुमालांत आपलं तोंड लपवून हुंदके देणाऱ्या मायराचं चित्र दृष्टीपुढून सहजासहजीं हलणं शक्य आहे काय ?

---

## ९ : : कुणाचं अडतं ?

आतांपर्यंत ज्या कादंबऱ्यांची मीं चर्चा केली त्यांची निवड करतांना कादंबरीलेखनाचे भिन्न भिन्न प्रकारचे नमुने वाचकांपुढें मांडण्याचा हेतु मीं मनाशीं ठेवला. कादंबरींत सर्व गुणांचा समुच्चय असावा असं म्हणणं म्हणजे ध्येयाची गोष्ट सांगण्यासारखं आहे. ही गोष्ट नामांकित लेखकांनासुद्धां नेहमींच साधत नाहीं, मग सामान्यांची तर गोष्टच सोडा. म्हणून सर्व गुणांचा समुच्चय प्रतिभेच्या असामान्य भरारींत आणि प्रयत्नाच्या शिकस्तीनंच केवळ साधण्यासारखा म्हणून बाजूला ठेवून, कोणत्या तरी एकाच गुणाच्या विशेष जोरावर कादंबरीची रंगत साधणं कसं शक्य असतं तें पाहावं लागतं. या दृष्टीनंच रचनाप्रधान कादंबरी, स्वभावदर्शनात्मक कादंबरी, रहस्यात्मक कादंबरी असे भेद मानले जातात, व या प्रकारांचे जे जे चांगले नमुने माझ्या वाचनांत मला आढळले त्यांचा त्यांचा मीं वाचकांना परिचय करून दिला.

परंतु या सर्वांहून भिन्न असा कादंबरीचा एक प्रकार संभवतो. या प्रकारांत लेखकाला तत्कालीन जीवितांतील प्रश्नांपैकीं एखादा प्रश्न वाचकांपुढें उभा करायचा असतो. या प्रश्नाचं निश्चित उत्तर

तो देईल अथवा न देईल. तें उत्तर सहजासहजीं देणं किती कठीण आहे एवढंच कदाचित् तो सूचित करील, किंवा वाचकांनींच आपापल्या विचारशक्तीनं तें काढावं असं तो पर्यायानं म्हणेल. मात्र एक गोष्ट त्यानं केलीच पाहिजे; ती ही कीं, कादंबरीच्या रूपानं एका विवक्षित प्रश्नाकडे वाचकांचं लक्ष त्यानं जोरानं वेधलं पाहिजे.

या हेतूनं कादंबरी लिहावयाची झाली कीं तिची रचना व मांडणी नेहमींच्या तंत्राहून जरा वेगळ्या प्रकारें करावी लागते. गुंतागुंत, निरगाठ, इत्यादि टप्पे साधून कथारचना करतां आली तर अर्थात् फारच चांगलं. परंतु त्यावांचूनहि अशा कादंबरीची मांडणी मनोवेधक रीतीनं करणं शक्य असतं. कोणत्या तरी एका विवक्षित प्रश्नाबद्दल वाचकांच्या विचारांना जोरानं चालना देणं, व शक्य तर सिद्धान्ताची दिशा सूचित करण्याजोगे आपले स्वतःचे कांहीं विचार वाचकांपुढें मांडणं हें असल्या कादंबरींत लेखकाचं मुख्य उद्दिष्ट असतं, व ही गोष्ट ज्या प्रमाणांत तो साध्य करील त्या प्रमाणांत त्याची कादंबरी यशस्वी ठरते. म्हणूनच असल्या कादंबऱ्यांचा एक स्वतंत्र वर्ग मानावासा मला वाटतो, व या प्रकारची कादंबरी कशी लिहावी त्याचा नमुना वाचकांपुढें मांडण्यासाठीं मला आवडलेल्या एका कादंबरीची निवड केली आहे.

या कादंबरीचं नांव "Going Their Own Ways" ( प्रकाशकः—कॅसेल, किं. ८ शिलिंग ). हिच्या लेखकाचं नांव "ॲलेक् वॉ" ( Alec Waugh ). या लेखकाच्या ज्या कादंबऱ्या मीं वाचल्या त्यांत "The Loom Of Youth", "So Lovers Dream" याहि कादंबऱ्या मला उल्लेखनीय वाटतात. गेल्या दहा पंधरा वर्षांतील जागतिक घडामोडींमुळें इंग्लंडांतील तरुण स्त्रीपुरुषांच्या जीवनांत जी क्रांति झाली तिच्या योगानें प्रणयाचा आविष्कार देखील त्यांच्या जीवितांत किती निराळ्या प्रकारें होऊं लागला

आहे तें सांगण्याची या लेखकाला मोठी हौस आहे; व या बाबतीं-तली त्याची हातोटीहि प्रसंशनीय आहे. "Going Their Own Ways" या कादंबरींत आधुनिक राहणीचा विवाहसंस्थेवर कोणता परिणाम झाला, व तो कितपत इष्ट आहे हा प्रश्न लेखकाला मुख्यत्वेंकरून पुढें मांडायचा आहे. त्यानं आपल्या कादंबरीला "A Story of Modern Marriage" असं उपशीर्षकच्च देऊन टाकलं आहे. या कादंबरींचं कथानक मी पुढें देत आहे तें वाचीत असतां, लेखकानं आपला संकल्पित प्रश्न उठावानं उभा करण्यासाठीं कथानकाचा सांगाडा कसा तयार केला, व प्रमुख पात्रं कशीं निवडलीं या दोन्ही गोष्टींकडे वाचकांनीं अवधान ठेवल्यास त्यांना तें कथानक अधिक मनोरंजक वाटेल.

कादंबरीची गोष्ट १९२८ सालीं सुरू होते, व १९३७ सालीं संपते. म्हणजे सुमारें आठ वर्षांचा अवधि लेखकानं घेतला आहे, व या आठ वर्षांत एका विवक्षित कुटुंबांतल्या स्त्री-पुरुषांचे विवाह कसे जमले, कसे तगले, व कोणत्या कारणांनीं मोडले याचं वर्णन त्यानं प्रारंभापासून अखेरपर्यंत केलं आहे.

लंडनमध्यें लॉंगमन्स्, मरे, मॅक्मिलन इत्यादि ज्या मोठमोठ्या नामांकित प्रकाशकांच्या कंपन्या आहेत तसलीच 'मॅक्सवेल हंटर' नांवाची एक मोठी कंपनी होती अशी कल्पना. जॉन फेन हा गृहस्थ त्या कंपनीचा मालक. कादंबरीचा प्रारंभ होतो त्या वेळेस याचं वय पन्नाशीच्या सुमारास होतं. प्रकाशनाच्या धंद्यांत यानं उत्तम पैसा मिळवलेला होता. लंडनच्या एका उपनगरांत त्याच्या मालकीचा एक मोठा बंगला होता, व एकंदरींत हा कुटुंबवत्सल गृहस्थ मोठा सुखांत होता. त्याला एकंदर चार मुलं होतीं: म्यूरिएल, बार्बारा, आणि जॉइस नांवांच्या तीन मुली, व बेसिल नांवाचा एक मुलगा. आईबापांचं मुलांवर आणि

मुलांचं आईबापांवर फार प्रेम होतं. आणि या कुटुंबाकडे पाहून कुणीहि असं म्हटलं असतं कीं, संसार असावा तर असा. जॉन फेनचं लग्न होऊन तीस वर्षं झालीं होतीं आणि आतां यापुढें त्याच्या संसाराची विघटना होण्यासारखी कांहीं गोष्ट घडेल असा संभव नव्हता. पण नक्की ही असंभाव्य गोष्टच प्रत्यक्ष घडली, व येथून कादंबरीला प्रारंभ झाला !

१९२८ सालीं जॉन फेन एकदां गॉल्फ खेळत असतां त्याची मॅबेल नांवाच्या तरुण स्त्रीशीं गाठ पडली. परिचय झाला, वाढत गेला, आणि अखेर त्याचं रूपांतर जें व्हायचं ते झालं. जॉनप्रमाणेंच मॅबेल देखील विवाहित होती. परंतु परस्परांच्या आकर्षणापुढें दोघांनाहि विवेक राहिला नाहीं. जॉननं लंडन शहरांत एक स्वतंत्र जागा घेतली व त्या जागेंत दोघांच्या मनसोक्त गाठीभेटी वारंवार होऊं लागल्या. हा प्रकार सात आठ महिने चालल्यावर मात्र जॉननं विचार केला हें लक्षण कांहीं ठीक नव्हे, आज तीस वर्षं आपण संभाळून राहिलों, आपल्या बायकामुलांसाठीं एक प्रकारची अभेद्य सुरक्षितता निर्माण केली आणि आतां आपण असे वाहत गेलों तर त्या सर्व गोष्टींचा विच्छेद होईल. तेव्हां मॅबेलचं हें प्रकरण संपविलं पाहिजे. तिला आपला व आपल्याला तिचा विसर पडेल असं कांहीं तरी केलं पाहिजे. समजा, आपल्या धंद्याचं निमित्त करून आपण अमेरिकेस निघून गेलों व तिकडेच दोन महिने राहिलों तर ?... जॉनच्या मनाला ही युक्ति मोठी चांगली वाटली व त्याप्रमाणें तो अमेरिकेस निघून गेला. त्याला मोठी आशा होती कीं आपण परत येऊं तों आपल्या संसारी जीवनाच्या प्रवाहांत उत्पन्न झालेली खळबळ थांबलेली असेल व आपलं आयुष्य आपल्याला पूर्ववत् चालू करतां येईल.

परंतु १९२९ सालच्या हिंवाळ्यांत जॉन अमेरिकेहून परत

आला तेव्हां त्याच्यासाठीं परिस्थितीनं निराळंच ताट वाढून ठेवलं होतं! मॅबेलच्या व जॉनच्या वामसंबंधाचा संशय तिच्या नवऱ्याला फार पूर्वी आला होता. त्यानं त्या दोघांच्या हालचालींवर पाळत ठेविली होती, व घटस्फोटाच्या खटल्याला हवा तेवढा पुरावा गोळा केला होता. जॉन अमेरिकेहून ज्या दिवशीं परत आला त्याच्या दुसऱ्याच दिवशीं त्याला कळलं कीं, मॅबेलचा नवरा घटस्फोटाची फिर्याद कोर्टांत दाखल करणार आहे.

जॉनवर हा मोठा आघात झाला. घटस्फोटाची केस कोर्टांत चालू झाली म्हणजे काय काय धिंडवडे निघतील व कशी कशी बेअब्रू होईल हें त्याला कळत होतं. तो स्वतःसाठीं घाबरला नाहीं, तर आपल्या कुटुंबाची जी सुरक्षितता तीस वर्षे व्यवस्थित वागून त्यानं उभी केली होती ती आतां कोसळणार या विचारानं तो भयभीत झाला. घटस्फोटाच्या फिर्यादींत स्वतःचा बचाव करावा, किंवा गुन्हा कबूल करून आपला संसार सोडून मॅबेलबरोबर एकत्र राहावं असा प्रश्न त्याच्यापुढें उभा राहिला. या प्रश्नावर विचार करतांना त्याच्या मनांतली चिंता एकच, कीं आपल्या मुलाबाळांना आपण सोडून गेलों तर त्यांचं पुढें कसं होईल?

काय करावं, कसं वागावं, कोणता मार्ग पत्करावा अशा अनिश्च-यांत जॉन फेननं बरेच दिवस घालविले. शेवटीं मात्र त्याच्या मनाची खात्री पटली कीं, आपल्या मुलाबाळांचं कसं होईल ही आपली चिंता अज्ञानमूलक आहे. आपण जरी घर सोडून मॅबेल बरोबर राहूं लागलों तरी आपल्या मुलाबाळांच्या आयुष्यावर आपल्याला वाटतो तितका मोठा परिणाम होणार नाहीं. दोन-चार आठवडे मोठा क्षोभ उत्पन्न झाल्यासारखं होईल; परंतु तो लवकरच शमेल, व आपलीं सारीं मुलं आपापल्या मार्गानं जीवित कंठतील. त्यांचं कांहीं एक वाकडं होणार नाहीं. कुणाचं अडतं!

आणि जॉन फेनची ही विचारसरणीच बरोबर ठरली. त्याच्या साऱ्या मुलांनीं जीविताचे आपापले मार्ग स्वतंत्रपणानं आक्रमिले, व त्यामुळें जीं काय सुखदुःखं त्यांच्या वांट्याला यायचीं तीं आलीं. त्याची सगळ्यांत थोरली मुलगी म्यूरिएल हिच्यासाठीं त्यानं एक श्रीमंत नवरा पाहून ठेवला होता, त्याच्याशीं तिचं लग्न झालं व तिला मुलंबाळंहि झालीं. तिच्या खालची त्याची मुलगी बार्बारा. हिला लहानपणापासून आपण अभिनयाची कला संपादन करावी व नटी म्हणून आपलं नांव गाजावं अशी मोठी महत्त्वाकांक्षा. तिची ती महत्त्वाकांक्षा पूर्ण झाली, परंतु तिचा विवाह सुखाचा झाला नाहीं. कादंबरीच्या अखेरीस ती हॉलिवुडला जाते व तेथून आपल्या भावाला पत्र लिहिते कीं, माझा नवरा माझ्याशीं घटस्फोट करील तर मला हवं आहे. जॉन फेनचा मुलगा बेसिल मोठा हुशार व कर्तृत्ववान् होता. त्यानं आपल्या बापाचा धंदा उत्तम प्रकारें पुढें चालविला. परंतु खरं विवाहसौख्य त्यालाहि मिळालं नाहीं. 'रेने' नांवाच्या ज्या मुलीवर त्याचं मनोमय प्रेम जडलं तिच्याशीं त्याचं लग्न होऊं शकलं नाहीं. आणि 'ज्युलिया' नांवाच्या ज्या मुलीशीं त्यानं लग्न केलं ती व तो खऱ्या आर्त प्रेमानं समरस होऊं शकलीं नाहींत. एवढंच कीं, दोघांनीं समंजसपणा केला, विवाहित आयुष्य म्हणजे एक प्रकारचा समेट होय हें ओळखून दोघांनीं आपला संसार सावरला, व समाधान मानलं. राहतां राहिली तिसरी मुलगी 'जॉइस'. कादंबरीच्या शेवटीं शेवटीं तिचं एका तरुणावर प्रेम बसतं, झपाट्यानं वाढतं, आणि कादंबरी संपते तीच मुळीं जॉइस व तिचा प्रियकर हातांत हात घालून बेसिलपुढें येतात व "आमचं दोघांचं लग्न ठरलं आहे" असं ती बेसिलला सांगते त्या प्रसंगीं! म्हणजे विवाहामुळें जॉइस सुखी झाली किंवा नाहीं तें कादंबरीकर्ता वाचकांना सांगत नाहीं.

कादंबरींत वर्णिलेल्या विविध घटना वाचून जॉइसचं विवाहित आयुष्य कसं झालं असेल त्याचा वाचकांनीं आपल्या मनाशीं तर्क करावा अशी लेखकाची इच्छा दिसते.

आणि बरोबर यासाठींच मला ॲलॅक वॉच्या या कादंबरीचा शेवट फार कलात्मक वाटतो. कादंबरीच्या एकंदर कथाभागांत चार विवाहांचे इतिहास लेखकानं कमी अधिक विस्तारानं वाचकांपुढें ठेविले आहेत. आधुनिक जीवितप्रकारांत प्रीति व विवाहाची स्थिरता यांची सांगड घालतां येणं शक्य आहे कीं नाहीं, ज्या दोघांचं एकमेकांवर विलक्षण प्रेम जडलं तीं दोघं विवाहसंबंधानं सुखी होण्याची खात्री देतां येत नसली तर त्यांनीं विवाह कशासाठीं करायचा, आणि अशा माणसांनीं विवाह करायचा नाहीं तर विवाहसंस्थेचं प्रयोजन तरी कुठें शिल्लक राहिलं ? इत्यादि प्रश्न त्यानं वाचकांपुढें जोरानं उभे केले आहेत. या प्रश्नाचीं जीं काय उत्तरं वाचकांना सुचलीं असतील त्यांच्या आधारानं त्यांनीं जॉइसच्या वैवाहिक सुखदुःखाबद्दल तर्क करावे असा कादंबरीकाराचा हेतु दिसतो. म्हणून त्यानं कादंबरीच्या अखेरीस जॉइसचं लग्न ठरलं एवढीच गोष्ट वाचकांना सांगितली आहे. लग्नामुळें ती सुखी झाली काय ? असं तुम्ही विचारलंत तर खांदे उडवून, भुंवया उंच करून आणि दोन्ही हात पुढें पसरून कादंबरीकार म्हणणार, तें तुमचं तुम्ही ओळखा. कारण मी तरी काय सांगणार, आणि मला तरी नक्की अंदाज कसा करतां येणार ? स्थिर वैवाहिक सुखाला यौवनसुलभ प्रीतीचा आधार पुरेसा होतो कीं नाहीं हाच मुळीं मोठा प्रश्न आहे. आधुनिक जीवितांतली ही समस्या मीं तुमच्यापुढें मांडली आहे. तेवढंच माझं काम होतं तें मीं केलं. जास्त मला कांहीं विचारूं नका. Good–bye !

हा शेवट अत्यंत कलापूर्ण नाहीं काय ?

मीं प्रथमच सांगितलं कीं, एका विशिष्ट प्रश्नावरचा अखेरचा सिद्धान्त काढण्याऐवजीं तो प्रश्न वाचकांच्या मनांत जोरानं उत्पन्न करण्यासाठीं लिहिल्या जाणाऱ्या ज्या कादंबऱ्या असतात त्यांतली ही कादंबरी आहे. या दृष्टीनंच या कादंबरीकडे वाचकांनीं पाहिलं पाहिजे, व अशी कादंबरी परिणामकारक रीतीनं कशी लिहावी तें समजून घेण्यासाठींच या कादंबरीचा अभ्यास केला पाहिजे. अशा अभ्यासाला उपयुक्त ठरतील अशा पुष्कळच गोष्टी या कादंबरींत आहेत. त्यांपैकीं कांहींचं मीं आतां थोडसं विवेचन करतों.

लेखकानं कादंबरीचे सहा विभाग केले आहेत; व त्यांना पुढीलप्रमाणें नांवं दिलीं आहेत. ( 1 ) The Fanes, ( 2 ) The pack redealt, ( 3 ) Marriages in flux, ( 4 ) Twenty months later, ( 5 ) A Man and her money, व ( 6 ) Their separate ways. मीं कथानकाचा सारांश दिला तो ध्यानांत आणून या वेगवेगळ्या विभागांत लेखकानं कथानकाची वांटणी कशी केली असेल त्याची थोडीशी कल्पना वाचकांना करतां येईल असं वाटतं. तें सारं विस्तारानं सांगण्याची आवश्यकता नाहीं. पहिल्या विभागाच्या अखेरीस जॉन फेन आपलं कुटुंब सोडून मॅबेलकडे राहावयास जाण्याचा निश्चय करतो, व तो त्यानं केल्यावर कथानकांतलं त्याचं कार्य संपतं. हें लक्षांत घेऊन लेखकानं त्याला निकालांत काढलं आहे; आणि पुढच्या पांची विभागांत त्याच्या मुलांच्या जीविताचे धागे तेवढे त्यानं हातीं घेतले आहेत. जॉन फेनच्या आयुष्यांतलि विचित्र घटनेचा त्याच्या मुलांवर यत्किंचितहि परिणाम झाला नाहीं; तीं सारीं आपापल्या मार्गानं जायचीं तशीं गेलीं; प्रीतीच्या व विवाहाच्या सुखदुःखांचे अनुभव त्यांना यायचे तसे आले; हेंच आपल्याला

मुख्यतः सांगायचं आहे याबद्दलचं अवधान लेखकानं केव्हांहि सुटूं दिलेलं नाहीं. आणि या गोष्टींचीं वर्णन करतांना—विशेषतः बेसिल व बार्बारा यांच्या हकीगती सांगतांना—त्यानं वाचकांपुढें एकच प्रश्न वारंवार उभा केला आहे. तरुण माणसांच्या आयुष्यांत प्रीतीला नक्की कोणतं स्थान आहे, प्रीति आणि विवाह यांचा अविभाज्य संबंध आहे कीं काय, आधुनिक तऱ्हेच्या आयुष्यक्रमांत विवाहाची स्थिरता कितपत शक्य आहे?

बेसिल व बार्बारा यांच्या उद्योगांची, महत्त्वाकांक्षांची, प्रणयोद्भव सुखांची, विवाह स्थिर ठेवण्याच्या धडपडींचीं वर्णनं वाचतांना हा एकच प्रश्न वाचकाच्या मनांत सारखा येत राहतो; व 'होय बुवा, या महत्त्वाच्या प्रश्नाचा नीट विचार झाला पाहिजे' असे उद्‌गार वाचक मनाशीं काढीत राहतो.

कादंबरीचा मुख्य विषयच विवाहसंस्थेबद्दल आहे, आणि व्हिक्टोरिया राणीच्या वेळीं त्या संस्थेचं जें स्वरूप होतं त्या मानानं आजच्या काळांत तें खरोखरीच सुधारलेलं आहे काय, प्रेमांत सापडणारीं व विवाह करणारीं आजचीं माणसं त्या काळच्या लोकांपेक्षां खरोखर अधिक सुखी आहेत काय, इत्यादि प्रश्नांवर वाचकांना विचार करायला लावण्याचा लेखकाचा हेतु आहे. या हेतूस पोषक अशा प्रकारेंच कादंबरींतील पात्रं बोलतील-चालतील व स्वगत विचार करतील अशी दक्षता त्यानं घेतली आहे. याचं एक उदाहरण म्हणून बार्बाराचं व तिच्या पतीचं अगदीं पटेनासं झाल्यानंतर आपला भाऊ बेसिल याच्याजवळ ती अंतःकरण उघड करते त्या वेळचा त्या दोघांचा संवाद, व नंतरचे बार्बाराच्या मनांतले विचार पहा—

बार्बारा पुढें सांगूं लागली,

" आतां आमच्या विवाहांत कांहीं अर्थ उरला नाहीं बघ. आम्हीं दोघांनीं मिळून कांहीं करावं हें आतां शक्यच नाहीं. उलट आम्हांला एकमेकांचा अडथळा माल झाल्यासारखा वाटतो. आज समाजाची स्थिति बहुतांशीं अशी आहे कीं, कोण कसं वागतं त्याची कुणी फिकीर करीत नाहीं, हवा त्यानं हवा त्याचा सहवास घ्यावा. तरी सुद्धां आमचं लग्न पांच वर्षांचं शिळं झालं असूनही मला दुसऱ्या कुणा पुरुषाचं प्रेम हवंसं वाटलेलं नाहीं. या गोष्टीचं तुला आश्चर्य वाटेल, पण ती तशी आहे खरी. आमचा घटस्फोट झाला तर मी दुसरं लग्न करीनहि. तथापि माझ्या पतीबरोबरच मला राहतां आलं असतं तर मी सुखी झालें असतें हें मी तुला सांगतें. कारण या प्रकरणांत नेहमींचा ठराविक त्रिकोण नाहीं, माझं अन् 'ह्यू'चं जमावं तसं जमत नाहीं इतकंच.आमचं हें लग्न म्हणजे—"

ती थांबली. जें आपल्याला सांगायचं आहे तें नीट सांगतां येत नाहीं अशा जाणीवेनं तिनं खांदे उडविले व म्हटलं,

" माझं हें सारं पुराण ऐकून तूं कंटाळला असशील बेसिल. पण कुणाजवळ तरी मनमोकळं बोलावं असं मला फार वाटत होतं. ज्या अनेक कारणांनीं लग्न म्हणजे मोठी भानगड होऊन बसते त्यांतलं हें एक कारण आहे. विवाहित आयुष्याचं सुख संपुष्टांत आलंसं वाटलं, तरी कुणाजवळ बोलतां येत नाहीं. मला वाटतं हें एकच दुःख असं आहे कीं, ज्यांत माणसाला कुणाला सहभागी करतां येत नाहीं. त्यामुळें अगदीं एकटं एकटं वाटायला लागतं."

बेसिल म्हणाला, " याचा अनुभव मला आहे."

" तुला ? पण तुझं तर लग्न अगदीं सुखाचं आहे ! "

" हंः ! प्रत्येकाला दुसऱ्याच्या लग्नाबद्दल असंच वाटतं."

" म्हणजे ? बेसिल—"

तो हसला. " माझी गोष्ट सोड. निदान आतां मी सुखांत आहे."

तिनं त्याच्याकडे टवकारून पाहिलं. त्याच्या बोलण्याचा अर्थ तिला समजेना, पण अधिक एक शब्दसुद्धां बोलण्याची त्याची इच्छा नव्हती असं त्याच्या मुद्रेवरून तिला वाटलं.

नंतर रस्त्यानं जातां जातां बार्बाराच्या मनांत अनेक विचार येऊं लागले. प्रत्येकाच्याच लग्नांत केव्हां तरी असं धोक्याचं स्थळ येतं काय, कीं पुढें काय होणार तें कळत नाहीं ? बेसिलच्याहि लग्नांत अशी धोक्याची वेळ येऊन गेली असेल असा तिला कधीं संशय आला नव्हता...आणि तरी मघांशीं बोलतांना बेसिल म्हणाला होता 'निदान आतां' मी सुखांत आहे, आणि 'आतां' या शब्दावर त्यानं जोर दिला होता. वरवर शान्त पण आंत खळबळाट लपलेला असंच सगळ्या लोकांच्या विवाहित आयुष्याचं स्वरूप असतं काय ?...तिला कळेना. एखाद्या कादंबरीच्या दोनशेंव्या पानापर्यंत पोंचल्यावर वाचकाला आगामी दुःखदायक घटना दिसूं लागावी, आणि आतां ही गुंतागुंत कशी सुटणार याचे तर्क करणं काय तें वाचकाला शिल्लक राहावं—अशा कादंबरीसारखी तिच्या विवाहाची गत झाली होती. कादंबरीचीं पानं अन् प्रकरणं उलटून टाकून शेवट पाहणं शक्य असतं. तद्वत् जीविताच्या कादंबरींतले भाग गाळतां येतील तर किती चांगलं ! पण दुर्दैव असं कीं, जीविताची ही कादंबरी प्रकरणच काय पण एक शब्दसुद्धां न गाळतां पुरी करावी लागते..."

याप्रमाणेंच बार्बारा अखेर हॉलिवुडच्या कंपनीचं आमंत्रण आल्यावरून तिकडे जाते तेव्हां तिला निरोप देऊन परत निघाले-

त्या बेसिल व जॉइस या भावंडांतलं संभाषण व नंतरचे जॉइसचे स्वगत विचार पाहण्यासारखे आहेत.

बार्बारा अमेरिकेला गेली याचा अर्थ ती तिचा पति ह्यू ह्याला कायमची सोडून गेली हें कुणालाहि सहज ओळखतां येण्यासारखं होतं. आणि म्हणूनच बार्बाराला निरोप देऊन परत निघाल्यावर जॉइसनं आपल्या भावाजवळ पहिले उद्‌गार काढले ते असे—

" आटोपला बार्बाराचा संसार ! "

आणि मग ती पुढें म्हणाली, " दोघांत तिसऱ्याचं वितुष्ट आलं कीं संसार भग्न होतो असं म्हणतात. पण मला वाटतं आमच्या बार्बाराचं एखाद्या परपुरुषावर प्रेम बसलं असतं तर तिचं लग्न कदाचित् टिकलं असतं."

आपले हे विचार आपल्या भावाला मोठे क्रांतिकारक वाटतील हें जणूं आपण ओळखून आहोंत अशी तिनं चर्या केली, व ती आणखी म्हणाली,

" कधींमधीं आठवड्यांतले दोन दिवस गुप्तपणानं व्यभिचारांत घालविले तरी कांहीं दुष्परिणाम होत नाहीं. एकनिष्ठा हाच काय तो विवाहाचा खरा आधार हें मला नाहीं पटत. लग्न टिकावं यासाठीं खरी गरज असते ती फार निराळ्या गोष्टींची. नवरा-बायकोच्या आवडीनिवडी एकच असल्या पाहिजेत, दोघांच्या महत्त्वाकांक्षा अभिन्न असल्या पाहिजेत, ज्या कोट्या एकाला आवडतील त्या दुसऱ्याला आवडल्या पाहिजेत, एकाचे स्नेही तेच दुसऱ्याचे स्नेही असले पाहिजेत......बार्बारा आणि ह्यू यांनीं कधींहि लग्न करायला नको होतं."

बेसिल म्हणाला, " पण तुला माहीत आहे, कीं तीं दोघं एक-मेकांच्या प्रेमांत सापडलीं होतीं. "

"तेंच माझं म्हणणं. प्रेमांत सापडलं कीं लग्न केलं पाहिजे असं काय म्हणून असावं? आपण आपला व्यवसाय ठरवितो तो किती व्यावहारिक दृष्टीनं? लग्नहि तसंच ठरविलं पाहिजे. प्रेम हें कारण आणि लग्न हा त्याचा परिणाम ही समजूत सोडली पाहिजे आपण."

अशा प्रकारे लेखकानं वाचकाच्या मनाला सारखे धक्के दिले आहेत. प्रीति आणि वैवाहिक आयुष्यांतील सौख्य व स्थिरता यांचा कार्यकारणसंबंध खरोखर आहे कीं नाहीं, व असला तर किती आहे याचा विचार कादंबरी वाचतांना वाचकाला वारंवार करावा लागतो.

आणि कादंबरींतल्या मध्यवर्ती प्रश्नाचा पाठलाग ज्याप्रमाणें ग्रंथ-कर्त्यानं चतुराईनं केला आहे, त्याप्रमाणेच कादंबरीची सुरुवात आणि अखेरी त्यानं विशेष कौशल्यानं साधली आहे. सुरुवात तर त्यानं बहारीनं केली आहे व कादंबरीचा सबंध पहिला विभाग अतिशय चित्ताकर्षक झाला आहे. कसा तो पाहा.

हे लक्षांत ठेवा कीं, या पहिल्या विभागाच्या अखेरीला जॉन फेन आपल्या बायकामुलांपासून विभक्त होतो. त्याचा व मॅबेलचा वामसंबंध उघड होतो, कुटुंबाच्या सुरक्षिततेबद्दल व आपल्या मुलांचं आपल्यावांचून कसं भागेल याबद्दल त्याच्या ज्या कल्पना असतात त्या भ्रामक आहेत असा त्याला उमज पडतो, आणि मग एका घटस्फोटाच्या खटल्यांत प्रतिवादी म्हणून आपलं नांव दाखल झालं याबद्दल त्याला भीति वाटेनाशी होते. अर्थात् ही घटना नाट्यपूर्ण करण्यासाठीं कादंबरीचा प्रारंभ कसा झाला पाहिजे? जॉन फेन आपल्या संसारांत अगदीं तृप्त आहे, त्याचं आपल्या बायका-मुलांवर व त्यांचं त्याच्यावर अगदीं निस्सीम प्रेम आहे, व त्यांच्या या नमुनेदार संसारसौख्यावर व कुटुंबाच्या सुरक्षिततेवर कसलंहि

संकट येणं शक्य नाहीं, असं चित्र जितक्या भडक रंगांत काढलं जाईल तितक्या प्रमाणांत कादंबरीची सुरुवात व पहिल्या विभागाचा शेवट यांत जबरदस्त विरोध उत्पन्न होऊन कलेचं सौंदर्य प्रगट होईल. ॲलेक वॉ यानं हा परिणाम अतिशय चतुराईनं साधलेला आहे.

जॉन फेन अमेरिकेची सफर संपवून ज्या दिवशीं परत घरीं येतो त्या दिवशीं त्याच्या स्वागताची तयारी करण्यासाठीं त्याच्या बंगल्यावर साऱ्यांची कशी एकच धांदल उडाली होती, त्याचं ग्रंथकर्त्यानं केलेलं वर्णन पाहण्यासारखं आहे.

" बागेंतल्या वाफ्यांतून अगदीं ताजीं लालबुंद 'कार्नेशन'चीं फुलं माळ्यानं काढून आणलीं. धनीसाहेब आल्यावर आपल्या खोलींत जेव्हां कपडे बदलायला जातील तेव्हां तीं त्यांच्या दृष्टीस पडलीं पाहिजेत अशी त्याची इच्छा होती. खालीं तळघरांत बटलर मद्य काढून तयार ठेवीत होता. अमेरिकेंत दारूबंदी असल्या-मुळें धनीसाहेबांना तिकडे मद्य मिळालं नसेल व आज घरीं आल्या-बरोबर उत्तमांतली उत्तम मदिरा त्यांना टेबलावर दिसली पाहिजे. मुदपाकखान्यांत घामाघूम झालेला स्वैंपाकी अगदीं शेलके पदार्थ तयार करण्यांत गुंतला होता, आणि हाताखालच्या लोकांची धांदल उडवून देत होता. बाबा लोकांच्या खोलींत बारा वर्षांची जॉइस आपल्या बाहुलीला अलंकार चढवीत होती व बजावीत होती, " हें अंगावरनं काढायचं नाहीं अं! बाबा येतील तेव्हां त्यांना तुझा हा सगळा थाट दिसला पाहिजे." दिवाणखान्यांत जॉनची पत्नी सारं ठाकठीक जमलं आहे कीं नाहीं तें पुनः पुन्हा पाहत होती, अन् आपल्या दोन थोरल्या मुलींना वारंवार बजावीत होती, "ते आले कीं, त्यांना घरांत अगदीं आनंद

भरलेला दिसला पाहिजे. आज त्यांच्याजवळ कोणी कसलीसुद्धां तक्रार करायची नाहीं. बरं का म्युरिएल? समजलं ना बार्बारा?..."

अशा तयारीनं जॉनचं सारं घर आनंदानं नटलेलं असतं; अर्थात् जॉन फेन परत आल्यावर जेव्हां बायकामुलांसह जेवायला बसतो तेव्हां आपला संसार किती नमुनेदार, आपल्या कुटुंबाचं आपल्यावर केवढं प्रेम, आपल्या कुटुंबजीवनाची सुरक्षितता किती अभेद्य याच विचारांनीं त्याचं मन भरून येतं.

"He was a proud father who had four such children. He was a proud man who had a wife like Mary to sit at the table's foot; so competent, so cheerful, so concerned about everybody's comfort: such a good mother, such gracious hostess. A proud man, a lucky man. How happy they all were together!"

आणि दुसऱ्याच दिवशीं त्याला मॅबेलचं पत्र येतं तें असं,

"Welcome home, John dear. It is good you are back. Please ring me the moment you arrive."

आणि जॉनची व मॅबेलची गाठ पडते तेव्हां ती त्याला सांगते, "माझ्या नवऱ्यानं घटस्फोटाची फिर्याद केली आहे आणि तुझं नांव प्रतिवादी म्हणून दाखल केलं आहे."

कादंबरींत समरप्रसंग उत्पन्न करण्याची ही शैली नमुनेदार नाहीं काय?

अशा या नाट्यपूर्ण प्रारंभाच्या साहाय्यानं कादंबरींतील मध्यवर्ती विवाहविषयक प्रश्न लेखकानं वाचकांपुढें उभा केला आहे, आणि मग कादंबरीच्या पांची विभागांत मोठ्या कसबानं तो खेळविला आहे.

या प्रश्नाचं असंदिग्ध उत्तर त्यानं कादंबरींत दिलं आहे असं मला वाटत नाहीं. तें उत्तर त्यानं पर्यायानं अन् हलक्या आवाजांत सुचविल्याप्रमाणें सुचाविलं आहे. मात्र तें सुचविण्याची तऱ्हा मोठी हृदयंगम आहे. कादंबरीच्या अखेरीस बेसिल आपल्या स्वतःच्या वैवाहिक जीवनाचं सिंहावलोकन मनाशीं करीत असतो, व केवळ प्रीतीच्या आधारावर स्त्री-पुरुषांचे विवाह स्थिर व सुखाचे होऊं शकत नाहींत, तर मग एकमेकांच्या प्रीतींत सापडल्याबरोबर त्यांना त्या प्रीतिबद्दल भलताच विश्वास कां वाटूं लागावा, असं तो मनाशीं आश्चर्य करीत असतो. त्याच्या मनांत येतं, माझ्या वडिलांची हकीगत ती तशी झाली, बार्बाराच्या विवाहाचा उच्छेद झाला, लग्न करून मी कितपत सुखी झालों हें माझं मला माहीत आहे. आतां राहतां राहिली जॉइस. तिनं आम्हां सर्वांपेक्षां अधिक शहाणपणा दाखविला तर तिची शाबास म्हणायची...

आणि तितक्यात जॉइस एका तरुण पुरुषाबरोबर त्याच्यापुढें येऊन उभी राहते व म्हणते, " बेसिल, आमचं दोघांचं लग्न ठरलं ! "

प्रीतीच्या सामर्थ्याविषयीं संशय घेऊन विचार करणाऱ्या बेसिलला किती मार्मिक उत्तर मिळाल्याचं लेखकानं दाखविलं आहे ? आणि जें उत्तर बेसिलला मिळालं तेंच कादंबरींतल्या मुख्य प्रश्नाचं उत्तर म्हणून वाचकांनीं समजावं असा लेखकाचा उघडच हेतु नाहीं काय ?

" बेसिलनं जॉइसच्या मुद्रेकडे पाहिलं. मग तिच्या प्रियकराकडे नजर टाकली. त्या दोन प्रेमिकांच्या डोळ्यांत जें हर्षाचं विलक्षण तेज त्याला दिसलं तें पाहतांच त्याच्या मनांतले घटकेपूर्वीचे संशय फिटले, प्रश्न सरले. प्रेमाची जादूच अशी आहे कीं

तें प्रत्यक्ष मिळत असतांना त्याच्या सामर्थ्याबद्दल संशय वाटत नाहीं. विवाहाच्या व स्त्री-पुरुष संबंधाच्या प्रश्नांबद्दल अगदीं शास्त्रीय दृष्टीनं कितीहि विवाद माजविले तरी शेवटीं हेंच एक उत्तर मानावं लागेल नव्हे काय?"

हें मनांत येऊन बेसिलनं आपल्या बहिणीचा हात मोठ्या आनंदानं हातीं घेतला व तो म्हणाला, "वा! वा! किती आनंदाची बातमी तूं सांगितलीस! फार फार आनंदाची!"

---

# १० 'माझा मुलगा! माझा मुलगा!'

कुठें आणि केव्हां तें मला नक्की स्मरत नाहीं; परंतु कुठें तरी दूरच्या प्रवासाला गेलों असतांना जुन्या काळचा एक प्रसिद्ध वाडा पाहावयास मी गेलों होतों. त्या वाड्याचा विस्तार येवढा प्रचंड कीं त्याला दहा बारा चौक होते. त्याच्या भोंवतालीं चहूं बाजूंस विस्तीर्ण रान होतं. जिकडे तिकडे पडझड झालेली होती. कित्येक वर्षांत त्या वाड्याकडे कुणी पाहिलं नव्हतं, त्याची डागडुजी कुणी केली नव्हती. वाड्याच्या प्रवेशद्वाराशीं उभं राहून आजूबाजूला दृष्टि टाकतांच माझं मन विलक्षण उदास आणि खिन्न झालं. आंत पाऊल टाकण्याऐवजीं तसंच परत जावं असं-देखील माझ्या मनांत आलं. परंतु त्या वास्तूची कीर्ति फार ऐकली होती म्हणून विचार केला कीं इथपर्यंत आलोंच आहोंत तर आंत शिरून पाहूं या तरी. मग सावकाश हिंडून सारं पाहिलं, आणि इकडेतिकडे जसजशी बारकाईनं नजर टाकली तसतसं वाटूं लागलं, खरोखरच पाहण्यासारखं आहे हें स्थल! वाड्याचे बहुतेक भाग पडीक झाले होते, तरीदेखील कांहीं दिवाणखाने अन् कांहीं खोल्या प्रेक्षणीय होत्या. मधेंच एका चौकांत लहानशी पुष्करिणी होती. तिच्या कारंज्यांतून निघणाऱ्या फवाऱ्यांचं दृश्य किती रम्य

होतं! एका छोट्याशा महालांतल्या लांकडी खांबावरचं नक्षीकाम विलक्षण सुबक होतं. आणि वाड्याच्या भोंवतालीं जरी बहुतांशीं रानगवत आणि लहानमोठीं कांटेरी झाडंच उगवलेलीं होतीं तरी तेथेंहि मध्येंच एखाद्या जागीं सहजासहजीं बनलेला हिरव्यागार तृणांकुरांचा लहानसा पट्टा दिसत होता. मध्येंच एखाद्या ठिकाणीं रानवट फुलझाडांचा झुबकाच्या झुबका उगवलेला असून त्याभोंवतीं लहान लहान पांखरं स्वच्छंदानं घिरट्या घालतां घालतां परोपरीचे मंजुळ आवाज काढीत होतीं. सारांश, त्या वाड्याचं व त्याच्या भोंवतींचं दृश्य एकंदरींत अव्यवस्थित आणि उदासवाणं असलं तरी त्यांतहि ठिकठिकाणीं असामान्य सौंदर्याचीं रम्य स्थळं माझ्या नजरेला दिसलीं, व अखेर मी परत आलों तो सगळ्यांना सांगितल्यावांचून मला राहावेना कीं तो वाडा एकदां मुद्दाम जाऊन पाहण्यासारखा आहे!

ही आठवण आज होण्याचं कारण असं कीं ज्या कादंबरीचा परिचय मी आतां वाचकांना करून देणार आहें तिला त्या वाड्याचा दृष्टान्त अगदीं तंतोतंत लागू पडण्यासारखा आहे. या कादंबरीची कीर्ति मीं फार ऐकिली होती. हिच्या सव्वा तीन लक्ष प्रती झपाट्यानं खपल्याचं वाचलं होतं. हिचा चित्रपट तयार झाला तो मला पाहायला मिळाला नाहीं, परंतु ज्यांनीं तो पाहिला त्यांच्या तोंडून त्याची फार प्रशंसा मीं ऐकिली होती. म्हणून ती कादंबरी मिळवून अतिशय उत्सुकतेनं ती मी वाचूं लागलों. परंतु दोन प्रकरणं वाचलीं, चार वाचलीं, दीडशें पानं उलटून पुढें गेलों, तरी माझं चित्त पुस्तकांत रमेना. पुस्तकाच्या वेष्टनावरचे अभिप्राय तर अतिप्रशंसेनं भरलेले होते. डॉ. क्रोनिन, जेम्स हिल्टन, राल्फ स्ट्राउस इत्यादि माझ्या आवडीच्या लेखकांनीं 'I insist that you read it', 'I enjoyed it enormous-

ly', 'Excitingly adventurous' अशी या कादंबरीची स्तुति केली होती; आणि वेष्टनावर प्रकाशकाची नोंद होती कीं, 'ही कादंबरी विलक्षण लोकप्रिय ठरल्यामुळें हिचीं फ्रेंच, जर्मन, इटालियन, पोलिश अशा आठ निरनिराळ्या भाषांत भाषांतरं झालीं आहेत.'

इंग्रजी साहित्यक्षेत्रांत जाहिरातबाजी आणि परस्परप्रशंसा किती माजलेली आहे हें मला ठाऊक आहे. ए. एस्. एम्. हाचिन्सन (ज्याच्या 'The Fire and the Wood' या कादंबरीची मीं चर्चा केली तो हा नव्हे; तो आर. सी. हचिन्सन) यांची 'He looked for a City' ही कादंबरी मीं नुकतीच वाचली होती. या कादंबरीचा केवढा गाजावाजा मीं ऐकला होता. स्वतः हाचिन्सननं या पुस्तकाच्या वेष्टनावर लिहिलं आहे कीं, 'ज्या तऱ्हेची कादंबरी लिहिण्याचं सुखस्वप्न मीं कित्येक वर्षं मनाशीं ठरविलं होतं त्या तऱ्हेची ही कादंबरी मीं अखेर लिहिली!' परंतु कादंबरी बिलकुल सामान्य होती. हा अनुभव ताजा असल्यामुळें मनांत आलं कीं परस्परप्रशंसेचाच हा आणखी एक नमुना असेल. परंतु विचार केला कीं पाहू या पुढें वाचून. पुढें वाचीत गेलों, आणि आश्चर्याची पण आनंदाची गोष्ट अशी कीं चौदाव्या प्रकरणांत एकदम असा एक प्रसंग वाचावयास मिळाला कीं त्या योगानं मी अगदीं संतुष्ट झालों. माझ्या चित्तावर पुस्तकाची पकड बसली; आणि मी सबंध पुस्तक वाचून संपविलं तेव्हां त्याच्या उदासवाण्या पण अपूर्व सौंदर्याची छाप माझ्या मनावर अशी कांहीं पडली कीं वाटलं, या कादंबरींत दोष असतील तर असोत, पण तिचे गुण असामान्य आहेत, आणि वाचकांना हिची ओळख करून दिलीच पाहिजे.

या कादंबरीचं नांव "My Son, My Son" (प्रकाशकः—

कॉलिन्स, किं. ६ शि.). हिच्या लेखकाचं नांव "हॉवर्ड स्प्रिग." माझ्या माहितीप्रमाणें या आयरिश लेखकाची ही अवघी तिसरीच कादंबरी आहे. मात्र हिनं त्याला त्रिखंड कीर्ति मिळवून दिली आहे. आणि या कादंबरीला एवढी प्रचंड लोकप्रियता तिच्या कोणत्या गुणांमुळें प्राप्त झाली तें सूक्ष्म नजरेनं पाहणं ललित-साहित्याच्या अभ्यासाच्या दृष्टीनं फायदेशीर ठरेल याबद्दल मला संशय नाहीं.

या कादंबरीचा मोठा अवगुण मीं प्रथमच सांगितला आहे. तो म्हणजे अनावश्यक विस्तार, आणि अशा विस्तारामुळें उत्पन्न होणारा विस्कळितपणा. आठशें पानांची ही कादंबरी नेहमींच्या साडेतीनशें पानांच्या चौकटींत खचित सामावली असती. पण अलीकडे कादंबरी प्रमाणाबाहेर फुगवून तिला Epic चं स्वरूप देण्याची प्रवृत्ति वाढत चालल्याचीं जीं उदाहरणं पाश्चात्य साहित्यांत दिसतात त्यांतलंच हें होय. प्रमाणबद्धता हें कला-कृतीचं एक प्रमुख अंग होय, आणि त्या दृष्टीनं या कादंबरीची शिफारस मला मुळींच करतां यावयाची नाहीं. परंतु हा एक मोठा दोष दृष्टीआड केला तर या कादंबरींत प्रशंसनीय गोष्टी पुष्कळ आहेत व त्यांकडेच मला वाचकांचं लक्ष वेधायचं आहे.

पहिली गोष्ट अशी कीं ही कादंबरी आत्मवृत्ताच्या पद्धतीनं लिहिलेली आहे. कादंबरीचा नायक स्वतः सबंध कथानक सांगत आहे. निवेदनाचं हें प्रथम-पुरुषात्मक तंत्र वापरणं बरचसं कठीण असतं. याचं कारण असं कीं ज्या प्रसंगांत नायकानं प्रत्यक्ष भाग घेतला तेवढेच प्रसंग कादंबरींत आणतां येतात. ही एक महत्त्वाची मर्यादा लेखकाला संभाळावी लागते, व त्याच्या हातून तिचं नकळत उल्लंघन होण्याचा संभव फार असतो. परंतु हॉवर्ड स्प्रिग यांनीं अशी चूक कुठेंहि होऊं दिलेली नाहीं; व यासाठीं

ज्या लेखकांना अशी प्रथम पुरुषात्मक कादंबरी लिहावयाची असेल त्यांनीं 'My Son, My Son' ही कादंबरी लक्षपूर्वक अवश्य वाचावी.

विल्यम इसेक्स या एका व्यक्तीचं चरित्र या कादंबरींत दिलेलं आहे. कादंबरीच्या सुरुवातीस एका सामान्य कुटुंबांत जन्मलेला विल्यम बारा वर्षांचा असतो, व अखेरीस तो अठ्ठेचाळीस वर्षांचा असतो. म्हणजेच विल्यमचं समग्र चरित्र या कादंबरींत दिलेलं नसून त्याच्या जीवितांतल्या सुमारें पस्तीस वर्षांची हकीगत या कादंबरींत आलेली आहे. आणि त्यांतल्या त्यांत चित्तवेधकतेच्या दृष्टीनं सामान्य, दरिद्री कुटुंबांत जन्मलेला निरक्षर विल्यम सुशिक्षित व विवाहबद्ध होऊन वयाच्या सुमारें पंचविसाव्या वर्षी लेखक म्हणून बरीच कीर्ति मिळवूं लागेपर्यंतच्या हकीगती मुळींच महत्त्वाच्या नाहींत. कादंबरीच्या एकंदर पांच विभागांपैकीं पहिले दोन विभाग अजीबात गाळले असते तरी कादंबरींत कोणतीहि कमतरता उत्पन्न झाली नसती. तेव्हां आतां कादंबरीचं कथानक सांगतांना प्रारंभीच्या जवळजवळ अडीचशें पानांचा अतिसंक्षेप करून उरलेल्या तीन विभागांचीच खरी कादंबरी आहे असं मानून मी तें सांगणार आहे.

विल्यम इसेक्स हा एका अगदीं गरीब कुटुंबांत जन्मलेला मुलगा. तो अगदीं लहान असतांना त्याचा बाप मेला, व शेजाऱ्यापाजाऱ्यांचं धुणंपाणं करून त्याच्या आईनं त्याचं संगोपन केलं. संगोपन याचा अर्थ पोटापुरता भाकरतुकडा त्याच्या ताटांत वाढला येवढाच. विल्यम बारा वर्षांचा झाला तरी त्याला अक्षरओळखदेखील झाली नव्हती. परंतु एका धर्मोपदेशकानं त्याला लिहायवाचायला शिकवलं; इतकंच नव्हे, तर निवडक पुस्तकांचं वाचनदेखील त्याच्याकडून करून घेतलं. पुढें हा धर्मोपदेशक वारला. परंतु त्यानं विल्यमला जें ज्ञानदान केलं त्याच्या

जोरावर त्या तरुण मुलानं चांगलंच नशीब काढलं. त्याची आई वारल्यावर त्यानं एकदोन फर्म्समध्यें चांगली नोकरी केली, व लवकरच एक उदयोन्मुख लेखक म्हणून लोक त्याचं नांव घेऊं लागले. अखेर आपली जन्मभूमि आयर्लंड सोडून विल्यम लंडनला आला व लेखनाचा व्यवसाय करून चांगल्या प्रकारें राहूं लागला.

मध्यंतरीं दोन गोष्टी घडल्या होत्या: एक, 'नेली' नांवाच्या तरुण स्त्रीशीं विल्यमचं लग्न झालं होतं; आणि त्याच्या सबंध जीवितक्रमावर परिणाम करणारी दुसरी गोष्ट म्हणजे 'डरमॉट ओरिऑर्डेन' नांवाच्या एका समवयस्क तरुणाशीं त्याचा अगदीं जिव्हाळ्याचा स्नेह जमला होता.

विल्यमला एक मुलगा झाला. त्याचं नांव 'ऑलिव्हर.' डरमॉटलाहि एक मुलगा झाला. त्याचं नांव 'रोरी.' दोघांचंहि आपापल्या पुत्रांवर कमालीचं प्रेम होतं. एकत्र बसून दोघे स्नेही गप्पा मारूं लागले कीं, डरमॉटनं म्हणावं कीं, 'ज्या मोठमोठ्या देशभक्तांनीं आयर्लंडच्या स्वातंत्र्यासाठीं दिव्य स्वार्थत्याग केला त्यांच्यासारखा माझ्या रोरीला मी देशभक्त करणार.' आणि विल्यमनंहि आपलं सुखस्वप्न सांगावं कीं, 'मी माझ्या ऑलिव्हरला अगदीं सुखांत आणि श्रीमंतींत लहानाचा मोठा करणार; त्याला कशाची ददात म्हणून पडूं देणार नाहीं. आणि माझ्याहिपेक्षां अधिक बुद्धिमान्, अधिक कीर्तिमान्, आणि अधिक कर्तृत्ववान् असा माझा मुलगा झालेला पाहण्याचं भाग्य माझ्या वांट्याला येणार.' त्याच्या ऑलिव्हरवरच्या प्रेमाला खरो-खरच मर्यादा नव्हती. ( आणि दुर्दैव असं कीं, या प्रेमाचेच दारुण दुष्परिणाम भोगण्याचं त्याच्या नशीबीं लिहिलेलं होतं ! )

विल्यमला एक मुलगा झाला तेवढाच. डरमॉटला मात्र रोरीच्या

पाठीवर दोन मुली झाल्या. त्यापैकीं थोरलीचं नांव 'मीव्ह.' ही अतिशय देखणी होती. लहानपणापासून हिला नाटकांचा फार नाद होता, आणि वयाच्या चौदाव्या वर्षापासून आपण एक नामांकित नटी व्हावं अशा महत्त्वाकांक्षेचं वेड तिच्या मनानं घेतलं होतं. तिच्या कलासक्तीचं कोडकौतुक विल्यमनं केल्यामुळें आपल्या पित्यापेक्षां विल्यमवर तिचं प्रेम अधिक जडलं. त्याच्याच सहवासांत ती अधिक राहूं लागली. आपल्या सौंदर्यशोधक वृत्तीचं व महत्त्वाकांक्षेचं कौतुक करणारा, धीर देणारा, आपला खरा हितकर्ता जगांत कुणी असेल तर तो विल्यम हा एकच होय अशी भावना तिच्या मनांत सतत वाढत गेली. आणि योगायोगानं एकीकडे नामांकित लेखक म्हणून विल्यमची कीर्ति जसजशी वाढत गेली, व दुसरीकडे रंगभूमीवर पदार्पण करण्याची संधि मिळून उदयोन्मुख नटी म्हणून विशीच्या सुमारास असलेल्या मीव्हचं नांव जसं गाजूं लागलं, तसं मीव्हच्या मनांत एक नवीनच सुखस्वप्न येऊं लागलं. विल्यमनं एक नाटक लिहावं, तें कल्पने-पलीकडे यशस्वी व्हावं, अन् त्यांत आपण मुख्य नायिकेची भूमिका करावी.

आणि सुदैवानं तिचं हें सुखस्वप्न खरं झालं. परंतु सुदैवानं असं तरी कसं म्हणावं? कारण या घटनेंतूनच पुढच्या विलक्षण शोकघटना निर्माण झाल्या. तेव्हां दुर्दैवानं असंच म्हटलं पाहिजे. कारण 'Every Street' हें नाटक रंगभूमीवर येण्याच्या जरा आधीं विल्यमची पत्नी नेली मोटरच्या अपघातांत मरण पावली होती. (आमच्या मराठी टीकाकारांना असला मोटरचा अपघात सोसत नाहीं! परंतु जिच्या सव्वातीन लक्ष प्रती तडाख्यानं खपल्या अशा या सामर्थ्यशाली ललितकथेंत तो झालेला आहे!) नेलीच्या मृत्यूमुळें विल्यमला विधुरावस्था आली. आणि येथूनच

कथानकांतल्या मुख्य पात्रांच्या सुखदुःखांची विचित्र गल्लत सुरू झाली. विल्यमविषयीं जें प्रेम मीन्हला लहानपणापासून वाटलं होतं त्याचं निष्कपट मुग्ध स्वरूप संपून त्याच्याविषयीं तिला तारुण्यसुलभ प्रीति वाटूं लागली. या वेळीं विल्यम बेचाळीस वर्षांचा व मीन्ह एकवीस वर्षांची होती. विल्यमला उद्देशून 'Darling Bill' असं ती लहानपणापासून म्हणत आली होती; परंतु आतां ते शब्द उच्चारतांना तिच्या मनांतला अभिप्राय कांहीं वेगळाच असे. मात्र तो तिनं विल्यमजवळ कधीं प्रगट होऊं दिला नाहीं. तशी भलती गोष्ट आपण कधीं करतां कामा नये, येवढा विवेक तिनं कटाक्षानं ठेवला. उलटपक्षीं, विल्यमच्याहि मीन्हविषयींच्या भावना निर्विकार व शुद्ध राहिलेल्या नव्हत्या, आणि आपलं चित्त आपल्या आवांक्याबाहेर जाऊं देतां कामा नये येवढं त्यालाहि कळत होतं. त्यामुळें तो व मीन्ह परस्परांवर अनुरक्त झालीं होतीं हें तर खरंच, परंतु दोघांनींहि संयम ओळखला व प्रीतीवर चढूं पाहणारा प्रणयाचा रंग एकमेकांच्या कधीं लक्षांत येणारं नाहीं अशी दक्षता ठेवून गाढ सहानुभूतीचे संबंध कायम राखले.

दोघांचा हा प्रयत्न कदाचित् विफल ठरला असता; परंतु या सुमारास आणखी एक गोष्ट घडली. मीन्हची समवयस्क मैत्रीण 'लिन्हिया' हिच्याशीं विल्यमचा जो परिचय झाला त्याचं रूपांतर प्रेमांत झालं. लिन्हियाविषयीं विल्यमला विलक्षण आकर्षण वाटूं लागलं व तिच्यावरचं त्याचं प्रेम उत्तरोत्तर अनावर होत गेलं.

या प्रकारांत शोककारक घटनेचीं बीजं फारशीं नव्हतीं. परंतु त्यांत एका अकल्पित प्रकाराची भर पडल्याबरोबर तीं एकदम निर्माण झालीं. विल्यमचा मुलगा ऑलिव्हर याचंहि लिन्हियावर प्रेम जडलं, आणि दैवाचा दुष्ट विलास म्हणावयाचा तो असा कीं,

लिव्हियालाहि त्याच्याविषयी अनावर आकर्षण वाटूं लागलं. ऑलिव्हर या वेळीं अवघा सोळा वर्षांचा असेल. परंतु निसर्गानं त्याला असामान्य सौंदर्य दिलं होतं आणि लिव्हियावर त्याच्या सौंदर्याची मोहिनी पडली. म्हणजे प्रेमाच्या बाबतींत पिता-पुत्रांमध्यें विरोध उत्पन्न झाला. मात्र हा प्रकार म्हणजे घर्षणाचा प्रारंभ नसून यापूर्वीच सुरू झालेल्या एका प्रक्रियेची परिपक्क अवस्था होती. कारण बालपणापासूनच ऑलिव्हर आपल्या बापाच्या अतीव वात्सल्याच योग्य चीज करण्याऐवजीं एक अतिप्रेमानं बिघडलेला मुलगा ठरणार असं वाटण्यासारखी वर्तणूक तो करूं लागला होता. शाळेंतल्या अभ्यासाकडे त्यानं कधींच लक्ष दिलं नाहीं. मास्तरांशीं त्यानं सदा भांडणतंटे करावेत. बापानं कितीहि पैसे पाठविले तरी ते पुरूं नयेत अशी त्यानं नेहमीं उधळपट्टी करावी. विल्यमला त्याचा फार त्रास सोसावा लागे व कधीं कधीं त्याच्या भवितव्याबद्दल त्याला चिंताहि वाटे. परंतु विल्यमचं वात्सल्य अपूर्व होतं. ऑलिव्हरनं कांहींहि केलं तरी विल्यमनं आपली ममता कमी केली नाहीं. त्याला समज आला कीं तो सुधारेल अशी श्रद्धा मनाशीं ठेविली. याचा परिणाम असा झाला कीं ऑलिव्हर सारखा बिघडतच गेला, आणि आतां तर एकाच स्त्रीविषयींच्या अभिलाषेमुळे बापलेकांचं वैर माजण्यासारखा प्रसंग निर्माण झाला !

ऑलिव्हरच्या सौंदर्याचा लिव्हियाला मोह पडला होता हें जरी खरं, व आपला व्यामोह तिनं प्रत्यक्ष विल्यमजवळून लपवून ठेवला नव्हता हें जरी खरं, तरी तिचं विल्यमवर प्रेम होतंच. कादंबरींत ती स्वतःच ठिकठिकाणीं स्वतःच्या स्वभावाचं दिग्दर्शन करतांना म्हणते, " पुरुषांच्या मोहाला चटकन् बळी पडणारी स्त्री आहें मी ! क्षणिक भावनेबरोबर वाहत जाण्याचा माझा स्वभाव आहे;

शांतपणें विचार करून वागणं मला कधीं जमायचं नाही!" लिव्हियाचा स्वभाव असा असल्यामुळें ऑलिव्हरच्या सौंदर्याचं आकर्षण आणि विल्यमसारख्या बुद्धिमान् आणि प्रख्यात लेखकाची प्रीति या दोन्हींचाहि तिच्या मनावर सारखाच परिणाम घडत होता, व ती हेलकावे खात होती. तिचा व विल्यमचा वाङ्निश्चय झालेला असतांनाहि प्रत्यक्ष लग्नाचा विधि उरकण्याचं ती लांबणीवर टाकूं लागली. ती विल्यमच्या जितक्या गाठीभेटी घेई तितक्याच ऑलिव्हरच्याहि घेई. एके रात्रीं तर तिच्या खोलींत ती व विल्यम एका शय्येवर असतांना अकस्मात् ऑलिव्हरनं तिच्या दारावर थाप मारली, व मग विल्यमवर लपून बसण्याची वेळ आली. या चमत्कारिक प्रसंगानंतर विल्यमनं विचार केला कीं आपला व लिव्हियाचा लग्न करण्याचा विचार ठरला आहे हें आतां ऑलिव्हरला सांगून टाकलंच पाहिजे. त्याप्रमाणें त्यानं ऑलिव्हरला ती गोष्ट सांगितली. ऑलिव्हरनं बापाला चक्क तोंडावर सांगितलं,"तुम्ही मोठी चूक करीत आहां!" आणि यापुढें वडिलांशीं संबंध ठेवायचा नाहीं अशा निश्चयानं तो घर सोडून निघून गेला. ज्या पुत्रावर कुणी पिता करणार नाहीं अशी ममता विल्यमनं केली, त्यानंच घराबाहेर पडून पर्यायानं सांगितलं कीं यापुढें तुमच्याशीं संबंध ठेवण्याची माझी इच्छा नाहीं.

लिव्हियानं प्रीतीशीं इमान राखलं असतं तर कदाचित् हाहि धक्का विल्यमला सुसह्य वाटला असता. पण तेंहि घडलं नाहीं. लिव्हियानं आपल्या वचनाचा भंग केला. ती पळून गेली व ऑलिव्हरबरोबर राहूं लागली. आपल्या दुर्वर्तनानं पित्याला दुःख देण्याच्या बाबतींत ऑलिव्हरनं आतां अगदीं कळस केला असंच कुणालाहि वाटलं असतं. पण नाहीं; खरा कळस अजूनहि पुढेंच होता. मध्यंतरीं १९१४ सालचं महायुद्ध सुरू झालं; हजारों

तरुण सैन्यांत दाखल झाले. ऑलिव्हर रणांगणावर गेला आणि कांहीं दिवसांनीं तर त्यानं मुर्दुमकी गाजवून व्हिक्टोरिया क्रॉसचा अत्यंत मोठा सन्मान मिळविला. ही बातमी वाचून विल्यमला साहजिकच वाटलं, असो, अखेर युद्धक्षेत्राच्या रणधुमाळींत का होईना माझ्या लेकानं नांव काढलं. त्याला मनःपूर्वक आनंद झाला. ऑलिव्हरच्या सर्व दुराचारांचं व अपराधांचं त्याला विस्मरण पडलं. पुत्राविषयींच्या अभिमानानं त्याचं मूळचं अतिवत्सल अंतःकरण भरून आलं.

परंतु विल्यमचा हा आनंद फार थोडा वेळ टिकायचा होता!

पत्नी कालवश झालेली, जिच्यावर अमर्याद प्रेम केलं ती लिव्हिया वचनभंग करून निघून गेलेली, ज्या पुत्राचे शेंकडों अपराध पोटांत घालून हृदयांतली ममता ढळूं दिली नाहीं त्यानं घर सोडून संबंध तोडून एक प्रकारें बहिष्कार घातलेला, अशा अवस्थेंत विल्यम दिवस कंठीत होता. आतां एकट्या मीव्हचाच काय तो त्याला आधार राहिला होता. ती आतां पंचवीस वर्षांची झाली होती. तिची कीर्ति आणि रूपसंपदा ऐन भरास आली होती. प्रथमपासूनच तिनं मनानं विल्यमला आपला प्रियकर मानलं होतं. अशा स्थितींत जेव्हां ती व विल्यम अधिकाधिक एकमेकाच्या सहवासांत जवळ येऊं लागलीं तेव्हां एका एकान्त भेटींत तिनं विल्यमजवळ आपलं प्रेम उघड केलं. वास्तविक आतां तिचं प्रेम स्वीकारून सुखी होण्यांत विल्यमला कसलाच प्रत्यवाय नव्हता. परंतु दैवानं आधींच एक भयंकर दुष्ट खेळ केला होता!

महायुद्ध चालू असतां ऑलिव्हर वारंवार रजेवर येत असे, व त्याच्या आणि मीव्हच्या एकान्तीं गाठीभेटी होत असत. मीव्हची कल्पना होती कीं अजूनहि विल्यमला लिव्हिया हवी आहे, व तिच्याशीं त्याला विवाह करतां येईल तर तो जन्माचा सुखी

होईल. म्हणून लिव्हियापासून ऑलिव्हरला दूर करण्याच्या हेतूनं तिनं ऑलिव्हरशीं प्रेमाचं अगदीं भरपूर नाटक केलं. इतकं कीं, तिनं त्याला आपलं सर्वस्व अर्पण करण्याचा वेडेपणा देखील केला आणि याचा भयंकर परिणाम असा झाला कीं तिला ऑलिव्हरपासून गर्भ राहिला.

अर्थात् ज्या प्रसंगीं मीव्हनं आपलं प्रेम विल्यमजवळ उघड करून सांगितलं व तें ऐकतांच विल्यमनंहि दीर्घकालपर्यंत अव्यक्त ठेवलेलं आपल्या मनांतलं प्रेम उघड करून तिला बाहुपाशांत घेऊन तिचीं चुंबनं घेतलीं, त्यावेळचं सुख अनुभवतांना मीव्ह मनाशीं जाणून होती कीं प्रेमपूर्तीच्या परमसुखाचा हा प्रसंग आपल्या आयुष्यांतला जसा पहिला तसाच अखेरचा. दुसऱ्याच दिवशीं ती आपल्या अंथरुणांत मेलेली आढळली !

विल्यम किती दुःखी झाला असेल त्याची कल्पना करणं अवघड नाहीं. पण दुर्दैवाच्या या प्रहारामागोमाग याहूनहि असह्य असा अखेरचा एक प्रहार त्याच्यावर व्हायचा होता. ऑलिव्हरचं दुर्वर्तन चालूच होतं. तो कर्जबाजारी झाला होता, आणि एखाद्या सराईत दिवाळखोराप्रमाणें त्याची दिनचर्या चालू होती. पितापुत्रांची गाठ आतां क्वचितच पडे. अशा स्थितींत राहत्या घराच्या भाड्याचा तगादा करायला आलेल्या घरमालकाच्या मुनीमाचा ऑलिव्हरनं खून केल्याची बातमी एके दिवशीं विल्यमला कळली. खून केल्यानंतर पळून जाण्याचा ऑलिव्हरनं प्रयत्न केला, पण तो सिद्धीस गेला नाहीं. त्याच्यावर खटला चालला व अखेर त्याचा फांसावर अंत झाला.

कादंबरीचं कथानक या ठिकाणीं संपलेलं आहे. मी वर सांगितलंच आहे कीं कादंबरीच्या एकंदर पांच विभागांपैकीं पहिले दोन विभाग—म्हणजे जवळ जवळ अडीचशें पानं—चित्तवेधकतेच्या दृष्टीनं अगदींच सुमार आहेत. पण हा एक मोठा दोष वगळला तर

पुढच्या तीन विभागांची रचना लेखकानं कुशलतेनं केली आहे असं म्हटलं पाहिजे; व त्या विभागांच्या मांडणींत लेखकानं जें कौशल्य योजलं आहे तें वाचकांना आतां सांगितलं तर समजेल. विल्यम व लिव्हिया यांच्या प्रेमाला ऑलिव्हरचा म्हणजे विल्यमच्या प्रत्यक्ष पुत्राचाच जो विरोध उत्पन्न होतो तो लेखकानं तिसऱ्या विभागांत रंगविला आहे, व त्या विभागाच्या अखेरीस ऑलिव्हर पित्याचा त्याग करून कायमचा जातो असं दाखविलं आहे. चवथ्या विभागांत लिव्हियाच्या प्रेमाला मुकलेल्या विल्यमचं दुःख लेखकानं वर्णिलं असून मीव्ह आणि विल्यम यांचा पहिलाच एकान्तांतील प्रेमप्रसंग दाखवून लगेच मीव्हच्या आत्महत्येचा प्रसंग लेखकानं घातला आहे, व त्याच ठिकाणीं त्या विभागाची अखेरी केली आहे. आणि शेवटच्या पांचव्या विभागांत ऑलिव्हरच्या हातून घडलेला खून व त्याचा शोककारक अंत इत्यादि हकीगती आणून विल्यमच्या शोकाची लेखकानं परमावधि करून टाकलेली आहे.

ही कादंबरी म्हणजे वाचकाचं चित्त विकल करून टाकणारी एक शोककथा आहे हें उघडच आहे; परंतु मर्मज्ञ वाचकांनीं या कादंबरीच्या स्वरूपाबद्दल जी एक विशेष गोष्ट समजून घ्यायला पाहिजे ती अशी कीं ही एक दुहेरी शोककथा आहे. कारण असं पाहा कीं कादंबरीचा नायक जरी विल्यम हा एकच पुरुष आहे तरी त्याच्यावर कोसळणारं दुर्दैव दुहेरी आहे. नायकाचा प्रत्यक्ष पोटचा मुलगाच या कादंबरींतील खलपुरुष आहे हें तर या कथेचं एक मोठं वैशिष्टय आहेच; परंतु हा खल-पुरुष एकाच प्रकारें नव्हे तर दोन प्रकारांनीं नायकाचा घात कसा करतो तें मुद्दाम लक्ष देऊन पाहण्यासारखं आहे. विल्यमच्या प्रणयाचं भग्नचित्र, आणि स्वतःच्या पुत्राबद्दल त्याच्या वात्सल्यपूर्ण अंतःकरणानं ज्या ज्या आशा उराशीं बाळगल्या

होत्या त्यांचं भग्नचित्र, अशा दोन हृदयविदारक चित्रांचं दर्शन आपल्याला या कादंबरींत घडतं. या दोन अत्यंत कारुण्यपूर्ण अशा दृश्यांचा संकलित परिणाम वाचकांच्या मनावर करण्याच्या हेतूनं ही कादंबरी लिहिली गेली आहे; आणि या कारणासाठीं तिचा अभ्यास वाचकांना व लेखकांना विशेष फायद्याचा होण्या-सारखा आहे.

प्रीतीच्या बाबतींत अभागी ठरलेला प्रेमी विल्यम, आणि ज्याचं वात्सल्य परिणामीं मूर्खपणाचं ठरलं व स्वतःच्या पुत्राविषयींच्या ज्याच्या साऱ्या आशा व आकांक्षा अखेर दग्ध झाल्या असा दुर्दैवी पिता विल्यम, या दोन चित्रांपैकीं मला स्वतःला दुसरंच चित्र अधिक महत्त्वाचं वाटतं; आणि त्या चित्राचे काळे, निळे, तांबडे रंग ज्या कसबानं लेखकानं एकावर एक चढविले आहेत त्यांकडेच वाचकाचं लक्ष विशेषेकरून वेधण्याची माझी इच्छा आहे. जुन्या पडीक वाड्याचा दृष्टान्त देऊन मीं प्रारंभींच सांगितलं आहे कीं या कादंबरींतील आकर्षक स्थलांकडे एकदां दृष्टि वळली कीं तशीं स्थलं पुस्तकांत जागोजाग विखुरलेलीं वाचकांना आढळतील. ज्या प्रसंगीं एकाच लिव्हियावर अनुरक्त झालेल्या पिता-पुत्रांच्या प्रणयाचे प्रवाह एकमेकांवर आपटतात तो प्रसंग, ऑलिव्हरच्या सहवासानं जिला मातृपद प्राप्त झालेलं आहे अशी मीव्ह जन्मभर अव्यक्त ठेवलेलं विल्यमविषयींचं आपलं उत्कट प्रेम अखेर व्यक्त करते तो प्रसंग—इत्यादि कांहीं प्रसंग तर जिज्ञासा, विस्मय, अनुकंपा इत्यादींचा प्रचंड कल्लोळ वाचकांच्या हृदयांत उत्पन्न करतील असे आहेत. तथापि या सर्व घटनांचा केवळ पार्श्वभूमि या नात्यानं उपयोग करून त्या पार्श्वभूमीवर विल्यमच्या शतशः विदीर्ण झालेल्या वात्सल्याचं मुख्य अतिरुद्र भेसूर चित्र हॉवर्ड स्प्रिंग यांना रंगवायचं होतं असं मी मानतों; व

या दृष्टीनंच अभ्यासू लेखकांनीं या ललित-कृतीकडे पाहावं असं मी म्हणेन.

हें मुख्य भयंकर शोकचित्र उठावदार करण्यासाठीं लेखकानं जें चातुर्य लढविलं आहे त्याचा अभ्यास करण्यासारखा आहे. विल्यमच्या वांट्याला कादंबरीच्या अखेरीस जें दुःख आलं त्याची दारुणता वाढविण्यासाठीं कादंबरीच्या प्रारंभीं त्याच्या अंतःकरणांतील वात्सल्याचं, व स्वतःच्या पुत्राविषयीं त्यानं आपल्या मनाशीं ज्या आकांक्षा ठेवल्या होत्या त्यांचं शक्य तितकं मधुर आणि कोमल चित्र रंगविणं आवश्यक होतं. हे अवधान हॉवर्ड स्प्रिंग यांनीं किती कौशल्यानं संभाळलं आहे हें वाचक जितक्या प्रमाणांत ओळखतील तितक्या प्रमाणांत त्यांना या असामान्य ललितकृतीचं खरं मर्म समजेल. यासाठीं कादंबरीचं ११७ वं पृष्ठ व अगदीं अखेरचीं ५८२–८३ हीं पृष्ठं वाचकांनीं मुद्दाम वाचावीं.

विल्यम व त्याचा स्नेही डरमॉट या दोघांना पितृपद प्राप्त होण्यापूर्वीं ते दोघे एकमेकांशीं संभाषण करतांना आपापल्या पुत्रांच्या भविष्यकालाबद्दल परोपरीचे मनोरथ रचीत; अशा वेळीं विल्यम नेहमीं म्हणे :

" माझ्या स्वतःच्या आयुष्यांत जें जें म्हणून मला करतां अगर उपभोगतां आलं नाहीं तें तें माझ्या पुत्राला साध्य व्हावं अशी माझी इच्छा आहे. मला दारिद्र्यांत दिवस काढावे लागले आहेत, अंतःकरणाचा एकटेपणा माझ्या वांट्यांला आलेला आहे. मला जर मुलगा झाला तर जीवितांत जें जें म्हणून सुखाचं आणि सुंदर आहे ते तें त्याला मिळावं असं मी करीन. त्याला कांहींहि उणं पडूं नये यासाठीं माझा देह मी झिजवीन, आणि त्याचं सुख मला माझ्या

डोळयांनीं पाहतां आलं कीं माझं आयुष्य धन्य झालं असं मला वाटेल ! ”

पुत्र पोटीं येण्यापूर्वींच त्याच्यासाठीं अपूर्व कष्ट व त्याग करण्याची प्रतिज्ञा करणाऱ्या या पित्याच्या वात्सल्याचं हें दृश्य किती हृदयस्पर्शी आहे ! आणि आशा अतीव वत्सल पित्याच्या वांट्याला अखेर पूर्ण निराशा आणि भयंकर दुःख यावं ही किती दुष्ट घटना ! कथानकाच्या शेवटीं ऑलिव्हरला तुरुंगांत फांसावर चढवितात त्यावेळीं त्याचा हा शोकमग्न दुर्दैवी पिता तुरुंगाच्या इमारतीच्या आसपास कांहीं काळ घोटाळत राहतो, आणि मग जड पावलांनीं हलके हलके तेथून दूर होतो. त्या वेळीं विल्यम म्हणतो—

“ लोक पांगले तेव्हां मीहि त्या उदासवाण्या रस्त्यांतून शहराच्या मध्य भागाकडे हलके हलके जाऊं लागलों. अंगावरून ट्रामगाड्या वेगानं जात येत होत्या, नीटनेटके कपडे करून आपापल्या उद्योगाला निघालेले स्त्रीपुरुष आनंदांत घाईघाईनं रस्त्याच्या दोन्हीं बाजूंनीं चालले होते. नवा दिवस उगवला होता, मानवी शक्तीची सरिता आपल्या ठराविक मार्गांनीं रोजच्याप्रमाणें वाहूं लागली होती. आभाळ ढगांनीं कोंदटलेलं होतं, पावसाचे अगदीं लहानलहान थेंब अंगावर पडत होते. त्यांचा मृदु स्पर्श अनुभवीत मी चाललों होतों, इतक्यांत एक स्त्री झपाझप पावलं टाकीत माझ्या अंगावरून पुढें गेली. तिच्या उघड्या छत्रीची कड माझ्या गालाला लागली तेव्हां तिनं अर्धवट वळून पाहिलं, आणि ती कांहींसं पुटपुटली. ती लिव्हिया होती ! मीं तिला ओळखलं त्याप्रमाणेंच तिनंहि मला ओळखलं असावं, पण ती थांबली नाहीं. सबंध अंग शहारल्यासारखं तिनं केलं, आणि ती धुक्यांतून पुढें झाली. मीं पाहिलं तों

तिचे केस पांढरे झालेले मला दिसले. तिचे कपडेहि मळके आणि जुने होते!"

ज्या पुत्रावर त्याचे सर्व दोष व अपराध पोटांत घालून अखेर-पर्यंत प्रेम केलं त्याच्या वधस्थानापासून परत निघालेल्या विल्यमची व लिव्हियाची रस्त्यांत पडलेली ही विचित्र अकल्पित गाठ म्हणजे लेखकानं शोककथेच्या हृदयद्रावक चित्रावर मारलेला कमालीचा योजकतेचा व मार्मिकतेचा कुचल्याचा एक नाजुक फटकारा होय. या प्रसंगीचं विल्यमचं वर्णन वाचून जेव्हां मीं कादंबरी हातावेगळी केली तेव्हां, "माझा मुलगा, माझा मुलगा" असं जेव्हां तेव्हां वात्सल्यानं आणि प्रेमानं उद्‌गार-णाऱ्या त्या दुर्दैवी पित्याची आकृति माझ्या मनश्चक्षूपुढे तरंगत राहिली; आणि मोठ्या डौलानं व यशाच्या आशेन समुद्रांत हाका-रलेलं गलबत अखेर वादळांत सापडून खडकावर आपटून छिन्नविच्छिन्न झालेलं मीं माझ्या डोळ्यांनीं पाहिलं असतं तर माझ्या मनाची जी अवस्था झाली असती तिचा अनुभव मला नंतर किती तरी वेळ येत राहिला. प्रभावी शोककथेच्या वाचनानं चित्ताची जी विलक्षण गंभीर आणि मूक अवस्था होते तिची ललित साहित्याच्या आल्हादांत अवश्य गणना करावी लागेल; आणि या अवस्थेचा प्रत्यय ज्यांना घ्यायचा असेल त्यांनीं "My Son, My Son" ही कादंबरी एकदां मुळांत वाचावी असं मी निःशंकपणें म्हणेन.

---

# प्रो. फडकेकृत पुस्तकें

**चरित्रें**

१ दादाभाई नौरोजी (३ री आ.)
२ टेरेन्स मॅक्स्विनी
३ डी व्हॅलेरा

**प्रबंध**

१ मानसोपचार (२ री आ.)
२ मानसोन्नति
३ सुखाचे संसार
४ संततिनियमन
५ आजचे तरुण स्त्री-पुरुष व त्यांजपुढील प्रश्न (२ री आ.)
६ प्रतिभा-साधन (दु. आवृत्ति)
७ वाङ्मयविहार
८ आधुनिक गीता
९ मानसमंदिर
१० साहित्य व संसार
११ मनोहरची आकाशवाणी
१२ वेचलेले मोती

**नाटकें**

१ युगांतर
२ संजीवन
३ जडावाची देवी
४ तोतया नाटककार
५ आगलावी
६ क्षमेसाठीं अपराध

**गोष्टी**

१ प्रो. फडके यांच्या गोष्टी भाग १ ला
२ प्रो. फडके यांच्या गोष्टी भाग २ रा
३ लोला आणि इतर गोष्टी
४ नमुनेदार गोष्टी

**कादंबऱ्या**

१ अल्ला हो अकबर!
२ कुलाब्याची दांडी (दु. आ.)
३ जादुगार (दुसरी आवृत्ति)
४ दौलत (दुसरी आवृत्ति)
५ अटकेपार
६ निरंजन
७ कलंकशोभा (दु. आवृत्ति)
८ उद्धार
९ काश्मिरी गुलाब
१० आशा
११ प्रवासी
१२ समरभूमि
१३ उन्माद
१४ गुप्त प्रायश्चित्त
१५ इंद्रधनुष्य

**रसात्मक निबंध**

१ गुजगोष्टी (दु. आवृत्ति)
२ नव्या गुजगोष्टी
३ धूम्रवलयें

**संकीर्ण**

१ टाकांच्या फेंकी (दु. आवृत्ति)
२ टांकीचे घाव

**इंग्रजी**

1 Sex Problem in India (2nd Edition)
2 Psychology
3 Elements of Ethics
4 Manual of Logic (3rd Edition)
5 Birth Control (2nd Edition)
6 History of Philosophy